


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन











अनुक्रमणिका

ISSN 2456-656X

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

जानेवारी ते मार्च २०१९




झाड तोडायचे, कापायचे, लगदा करायचा,
कागद बनवायचा
त्यावर लिहायचे, ते छापायचे, मग वाचायचे
एवढा खटाटोप कशासाठी?
सरळ झाडच वाचावे!

वसंत आबाजी डहाके

अनुक्रमणिका





महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे शाखा अंमळनेर आयोजित युवा साहित्य-नाट्य संमेलन अध्यक्ष हर्षल पाटील (जळगाव) व इतर मान्यवर.



महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे शाखा गुहागर आयोजित विभागीय साहित्य संमेलनाचे अध्यक्ष प्रसिद्ध लेखक अभिराम भडकमकर यांचा सत्कार करताना मान्यवर.




महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे शाखा मंगळवेढा आयोजित शाखा मेळाव्यातील ग्रंथदिंडीत सहभागी मान्यवर.

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. ३६५, जानेवारी-मार्च २०१९



संपादक

**डॉ. पुरुषोत्तम काळे**







प्रकाशक

**प्रकाश पायगुडे**

प्रमुख कार्यवाह




**महाराष्ट्र साहित्य परिषद**

टिळक रस्ता, पुणे ४११०३०. दूरभाष : ०२०-२४४७५९६३

संकेतस्थळ : www.masapapune.org

ई-मेल : masaparishad@gmail.com

(कार्यालयाची वेळ : स. ९.३० ते १२, दु. ४.३० ते रा. ८)



अनुक्रमणिका









मुद्रक-प्रकाशक
**प्रकाश पायगुडे**
प्रमुख कार्यवाह
महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ४११०३०.

जाहिरात व्यवस्थापक
**वि. दा. पिंगळे**
९८८१२३५०३३

संपादकीय संयोजन
**संदीप खाडे**

अक्षरजुळणी व सजावट
**आर्ट ॲडव्हर्टायझिंग**

मुखपृष्ठ
**जयदीप कडू**

मुद्रितशोधन
**आरती देवगांवकर**

मुद्रणस्थळ
**एस.ए. प्रिंटर्स, एल.एल.पी.**
फ्लॅट नं.५, ३रा मजला,
सिद्धीविनायक अपा.,
शिवदर्शन, पुणे ४११००९.

मूल्य : १५ रुपये

प्रकाशन क्र. ३६५
जानेवारी-मार्च २०१९



# अं त रं ग



अनुक्रमणिका





संपादकीय

डॉ. पुरुषोत्तम काळे

# वसंत आबाजी डहाकेंना 'जनस्थान' : व्रतस्थ कवीचा सार्थ गौरव!


संपादकीय लिहित असताना मराठीतील ख्यातकीर्त कवी, समीक्षक आणि माजी संमेलनाध्यक्ष रा. रा. वसंत आबाजी डहाके यांना कुसुमाग्रज प्रतिष्ठानचा जनस्थान पुरस्कार जाहीर झाल्याचे शुभवर्तमान समजले. डहाके यांच्या सन्मानाने समाधान वाटले. डहाके यांची कविता ही परात्म झालेल्या माणसाचे चित्रण करणारी आहे. भवतालाचे भेदक अर्थनिर्णयन डहाके त्यांच्या कवितेतून करतात. मानवी जगण्याची खालावलेली पातळी, आयुष्य ग्रासून टाकणारे दुःख, एकाकीपण, अस्थिर जीवन, पराधीनता आणि सर्वव्यापी दहशत-भय त्यांच्या कवितेतून प्रतिमांकित भाषेत अवतरते. योगभ्रष्ट, शुभवर्तमान, शुनःशेप आणि चित्रलिपी इत्यादी कवितासंग्रहांमधून जीवनाचा शोकात्म प्रत्यय देणारी; पण आतून प्रखरपणे राजकीय असलेली कविता वाचकांना अस्वस्थ करते. डहाके एका ठिकाणी म्हणतात त्याप्रमाणे 'कविता ही 'अस्तित्वाची रणभूमी' असते कारण मानवी समाजाला, त्याच्या अस्तित्वाला, त्याच्या संघर्षाला ती मूर्त करते. 'त्यांची कविता याला अपवाद नाही.

'शहर मला सोबत देतं यातनांचं कारंजं
ते घेऊन मी हिंडतो अनवाणी रस्त्यावरून, विद्यापीठातून...' (कत्तल)

मुळापासून तुटलेल्या मानवी आयुष्याचं चित्रण डहाके यांनी संयतपणे केले आहे.

'मी देठ तुटलेल्या या शहरी
काळोखाचा राजपुत्र,
जमीन उकरून बाहेर काढतोय
माझे आनंद माझे उल्हास' (योगभ्रष्ट)



आसपासच्या परिस्थितीमुळे दुःखी झालेल्या अभाग्यांसाठी डहाके म्हणतात, 'मी म्हणतोय गाणं/ या दुःखी जनावरांसाठी / माझ्या खांद्यावर डोकं ठेवून पडलेल्या / त्याचं दुखरं काळीज आणि ठणकणारं मस्तक / शांत करणारा एखादा सूर मी शोधतो आहे / जळत असलेल्या माझ्या आतड्यात घशांतून निघू पाहत आहे / दुःखी जनावरांची घुसमटती गुरगुर...'

त्यांची कविता ही कोणत्याही घोषणा करीत नाही. ती भवतालाच्या भेदक वास्तवावर मर्मभेदी भाष्य करते. ही कविता समकालीन सामाजिक आणि राजकीय दस्तावेज आहे. कवी, कादंबरीकार, समीक्षक, चित्रकार असलेले वसंत आबाजी डहाके आपल्या स्पष्ट आणि अंतर्मुख करणाऱ्या वक्तव्यांसाठी जाणकार रसिकांना परिचित आहेत. याचा प्रत्यय त्यांच्या चंद्रपूर येथील साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून केलेल्या भाषणातून आला.











अनुक्रमणिका

'आपल्या आसपासच्या आजच्या काळाला / काय झालेलं आहे / चालता बैल एकाएकी खाली कोसळावा / आणि चाऱ्ही पायी झाडू लागावा, / तसं याचं का म्हणून झालेलं आहे, याचं दुखणं काय, / याला कसली व्याधी जडलेली आहे / याचा विचार करावा...'

कलावंतांनी, लेखकांनी, विचारवंतांनी आपला काळ वाचावा आणि तो आपल्या कलाकृतीतून, साहित्यकृतीतून व्यक्त करावा अशी डहाके यांची धारणा आहे. आपली भूमिका सच्चेपणाने मांडणाऱ्या आणि वंचितांच्या बाजूने आपल्या कवितेतून आवाज उठविणाऱ्या डहाके यांना जनस्थान पुरस्कार मिळाल्याने त्यांच्या कवितेचाच नव्हे तर त्यांच्या नैतिक भूमिकेचाच सन्मान झाला आहे. मा. वसंत आबाजी डहाके यांचे मनःपूर्वक अभिनंदन! मुखपृष्ठावरील डहाके यांचे छायाचित्र जयदीप कडू यांनी उपलब्ध करून दिले याबद्दल धन्यवाद!

९२वे अखिल भारतीय मराठी साहित्यसंमेलन यवतमाळ येथे पार पडले. हे संमेलन यशस्वी झाले. या संमेलनाचे निमंत्रक डॉ. रमाकांत कोलते आणि त्यांच्या सहकाऱ्यांचे अभिनंदन! नयनतारा सहगल यांना आमंत्रण देऊन नंतर त्यांना येऊ नका, असे सांगणे हे निषेधार्ह आहे. हा वाद टाळता आला असता. सन्मानपूर्वक आमंत्रण देऊन अपमान करणे ही महाराष्ट्राची संस्कृती नाही. महामंडळाच्या सदस्यांना सहगल यांना आमंत्रण देण्याच्या निर्णयाची कल्पना होती का? त्यांना या निर्णयप्रक्रियेत सहभागी करून घेतले होते का? तत्कालीन महामंडळ अध्यक्ष श्रीपाद जोशी यांनी एकट्यानेच निर्णय घेतले का? या प्रश्नांची उत्तरे उद्वेगजनक आहेत, असा गोंधळ यापुढे होऊ नये. जरी या वादाचे सावट संमेलनावर पडले तरी संमेलनातील कार्यक्रम, परिसंवाद आणि ग्रंथप्रदर्शनाला रसिकांचा उत्तम प्रतिसाद लाभला, ही जमेची बाजू! संमेलनाच्या व्यासपीठावर मावळते अध्यक्ष मा. श्री. लक्ष्मीकांत देशमुख यांनी महामंडळ आणि संयोजकांना परखड बोल सुनावले हे बरेच झाले. संमेलनाच्या अध्यक्ष डॉ. अरुणा ढेरे यांचे संयत आणि समर्पक भाषण रसिकांना आवडले.

मराठीला अभिजात दर्जा मिळावा यासाठी म.सा. परिषद आणि इतरांनी आंदोलने केली. सरकारने आजतागायत मराठी भाषेला अभिजात दर्जा दिलेला नाही. निवडणुकीच्या तोंडावर सवलतींचा वर्षाव होईल; पण या सरकारच्या कार्यकाळात अभिजात दर्जाविषयीचा निर्णय होणार नाही. याचे कारण मराठी भाषिक जनतेचा जेवढा दबाव या प्रश्नावर निर्माण व्हायला हवा होता तेवढा झालेला नाही. मराठी भाषा दिनाच्या निमित्ताने मराठी भाषा गौरवाचे पोवाडे गायले गेले; पण तिच्या हक्कांच्या देण्याबाबत सरकार उदासीन आहे. 'अभिजात दर्जा लवकरच मिळेल' हे गाजर मराठीभाषिक जनतेला दाखविण्यात आले. उठसूठ भावना दुखावून घेणारे आम्ही मराठीबाबतच्या या सरकारच्या सापत्नभावाबाबत मूग गिळून गप्प बसतो. आमचे क्षात्रतेज जागे व्हावे आणि संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्यामध्ये जो मराठी मनाचा निग्रह मागे दाखविला तसा या भाषिक अन्यायाविरोधात दाखवावा.

देशाचे माजी संरक्षणमंत्री आणि गोव्याचे मुख्यमंत्री मनोहर पर्रिकर यांचे दुःखद निधन झाले. तसेच गोवा विधानमंडळाचे माजी उपसभापती आमदार विष्णू सूर्या वाघ, ज्येष्ठ साहित्यिक नामवरसिंह आणि इचलकरंजी शाखेचे कार्याध्यक्ष अशोकराव दवंडे यांचेही नुकतेच दुःखद निधन झाले. त्यांना महाराष्ट्र साहित्यपत्रिकेतर्फे भावपूर्ण आदरांजली.

या अंकात डॉ. अजय देशपांडे यांचा वसंत आबाजी डहाके यांच्या कवितेची सौंदर्यस्थळे उलगडून दाखविणारा लेख, डॉ. देवानंद सोनटक्के यांचा 'स्वातंत्र्योत्तर मराठी कादंबरी : नायक संकल्पनेतील बदल', प्रा. नामदेव गपाटे यांचा दिगंबर पाध्ये यांचे समीक्षालेखन आणि वंदना आकाशकर यांचा 'श्री चक्रधरांचा स्त्रीविषयक दृष्टिकोन' हे लेख रसिक वाचकांना आवडतील. 'पु. ल. : देवाघरचे देणे' हा पु. ल. देशपांडे यांच्यावरील निखिल कुलकर्णी यांनी लिहिलेला ललित लेख वाचकांच्या पसंतीस उतरेल. डॉ. सुहासिनी इर्लेकर यांच्या 'अन्यायालयातील न्यायालयात' या संपादित काव्यसंग्रहाची मर्मग्राही समीक्षा डॉ. अश्विनी धोंगडे यांनी केली आहे.

महाराष्ट्र साहित्य पत्रिका आर्थिकदृष्ट्या सक्षम व्हावी म्हणून आम्ही जाहिरातदार, रसिक वाचक आणि देणगीदारांना आर्थिक साहाय्यासाठी आवाहन करीत आहोत. निधीसंकलनासाठी एक समिती नेमण्यात आली आहे. सन्माननीय पदाधिकाऱ्यांच्या आणि कार्यकारिणी सदस्यांच्या सहकार्याने म. सा. पत्रिका आर्थिकदृष्ट्या सबल होईल, हा विश्वास वाटतो.

अंकासंदर्भातील आपल्या प्रतिक्रियांचे स्वागत आहे.

◆

**डॉ. पुरुषोत्तम काळे**
चलभाष : ९४०४९३७७१०
purushottamdkale@gmail.com

(टीप : हा अंक मसापच्या www.masapapune.org या संकेतस्थळावर तसेच डेलीहंट या मोबाईल ॲपवरही उपलब्ध आहे.)



लेख

डॉ. देवानंद सोनटक्के



साहित्य अकादमी, मुंबई आणि विठ्ठलराव शिंदे कला महाविद्यालय, टेंभूर्णी यांच्या वतीने दि. ८ फेब्रुवारी, २०१९ रोजी आयोजित 'स्वातंत्र्योत्तर मराठी कथन साहित्यातील बदल' या विषयावरील चर्चासत्रात सादर केलेला शोधनिबंध.



# स्वातंत्र्योत्तर मराठी कादंबरी : नायक संकल्पनेतील बदल

धुनिक जगाच्या बदलेल्या स्वरूपाचा आणि कादंबरीचा अत्यंत घनिष्ठ संबंध आहे. या जगाने धर्मश्रद्धांचे मानवी आयुष्यावर असलेले सर्वंकष प्रभुत्व नाकारण्याचा प्रयत्न केला आहे. ज्ञानाच्या आणि ज्ञानपरंपरेहून वेगळ्या रूपाचा शोध, सभोवतालच्या निसर्गातील नियमांचा शोध घेऊन त्यातून मानवी जीवन समृद्ध करण्याची ऐहिक वृत्ती आधुनिक जगाच्या केंद्रस्थानी आहे. विज्ञानक्रांती, विज्ञानातून सिद्ध झालेली नवनवी तंत्रज्ञाने, उत्पादन साधनांमध्ये घडून आलेले बदल, औद्योगिक क्रांती, भांडवलदारी व्यवस्थेचा उदय अशा विविध घटनांनी हे आधुनिक जग गजबजलेले आहे. या सर्व बदलांमुळे युरोपीय मानवाची जीवनदृष्टी आमूलाग्र बदलली आणि अधिक गुंतागुंतीचीही झाली.

- **हरिश्चंद्र थोरात**, (कादंबरी : एक साहित्यप्रकार)

कादंबरी आधुनिक जगाचे महाकाव्य असून मानवाची आधुनिक जीवनदृष्टी, जगण्याची गुंतागुंत यांचे कथन करू पाहणारा हा साहित्यप्रकार आहे. तिचा संबंध आधुनिक जगाच्या बदललेल्या स्वरूपाशी आहे. हे आधुनिक जग गुंतागुंतीचे आहे; मात्र अशा जगाच्या वास्तवाचे कथन करणे हे कादंबरीकारांसमोरचे मोठे आव्हान असते. कुसुमावती देशपांडे यांच्या मते, अशा जीवनाची उकल करण्याच्या प्रयत्नात ज्या लेखकाजवळ अनेक मूलभूत समस्यांचे ज्ञान, आर्थिक, वैज्ञानिक व सामाजिक प्रवृत्तींची माहिती यांचा प्रकाश असेल त्यालाच थोडेतरी यश मिळण्याचा संभव आहे. यासाठी भरीव व्यासंगाची, व्यापक अनुभूतीची आवश्यकता आहे. या जीवनाचे केंद्र म्हणजे व्यक्ती. व्यक्तिचित्रणातील समग्रतेवर कादंबरीचा प्राण अवलंबून असतो. आजचा कादंबरीकार केवळ माणूस म्हणून माणसाजवळ जाऊ शकला, तरच त्याला ही समरसता लाभणे शक्य दिसते. एरव्ही, माणसामाणसांत तटबंदी उभी करण्यासाठी आज कित्येक शक्ती सज्ज आहेत. माणसाच्या अंत:करणाविषयी सहृदय समज व मानवी जीवनाविषयी व्यापक, सुजाण व सुसंगत दृष्टिकोन हे आजच्या कादंबरीकाराला आवश्यक असणारे निदानीचे गुण आहेत. (कुसुमावती देशपांडे: १९७५: ३४३)



कादंबरीसमोरील हे आव्हान पेलण्यासाठी पन्नास वर्षांपूर्वी कुसुमावतीबाईंनी कादंबरीकाराजवळ मूलभूत समस्यांचे ज्ञान, आर्थिक, वैज्ञानिक व सामाजिक प्रवृत्तीची माहिती, व्यापक अनुभूती, व्यासंग, माणसाविषयीची सहृदय समज आणि मानवी जीवनाविषयी व्यापक जाण यांची गरज बोलून दाखवली होती. या जीवनाचे केंद्रच व्यक्ती असल्यामुळे त्यांनी व्यक्तिवाद आणि 'व्यक्ती'ला महत्त्वाचे मानत कादंबरीत व्यक्तिचित्रणाला महत्त्व दिले आहे. त्यांच्या मते,



अनुक्रमणिका






समाजजीवनातूनच व्यक्तिजीवनाचा उगम होतो, समाजजीवनानेच व्यक्तिजीवनाची पातळी व त्याचे स्वरूप निर्णीत होत असते (कुसुमावती देशपांडे: १९७५: ३४२) त्यामुळे त्यांनी कादंबरीकाराच्या समाजलक्ष्यी वास्तवावर व व्यक्तिलक्ष्यी जाणिवेवर भर दिला आहे. त्यांच्या मते, कादंबरीकार वास्तवतेचे कथन करण्याच्या नादात समाजलक्ष्यी आशयावर भर आणि व्यक्तिकेंद्री आशयाकडे दुर्लक्ष करतात.

म्हणून अशा व्यक्तिलक्ष्यी कथनाला केंद्रवर्ती ठेवूनच 'स्वातंत्र्योत्तर कादंबरी : नायक संकल्पनेतील बदल' या गृहितकावर मी लक्ष केंद्रित केले आहे.

दुसरे असे की, मराठी कादंबरीची निर्मिती, प्रसार आणि वाचन या तिन्ही प्रक्रियांवर पाश्चात्त्य संस्कृतीचा प्रभाव पडलेला आहे. मुद्रणामुळे लेखकाचा आश्रयदाता बदलला. वाचणाऱ्या वर्गात कादंबरीचा प्रसार झाला. वाचकाचे स्वरूपच बदलल्यामुळे पारंपरिक कथनरूपातही बदल झाला. 'आपल्या पारंपरिक कथन पद्धतीत, कल्पित निवेदक कल्पित श्रोत्याला कथा सांगत असे आणि भोवतालच्या खऱ्याखुऱ्या वाचकापासून आणि वास्तवापासून कथनरूप सुरक्षित अंतरावर ठेवत असे. मात्र इंग्रजीच्या प्रभावातून, कथाबाह्य असलेला वाचक कथनरूपाच्या संरचनेच्या दृष्टीने महत्त्वाचा ठरू लागला (थोरात हरिश्चंद्र: २०१०: ५) तात्पर्य, इंग्रजी संपर्कामुळे कथन पद्धतीत बदल झाला आणि त्यातून कादंबरीची संरचना व्यक्तिसापेक्ष-वाचकसापेक्ष झाली. याही अर्थाने व्यक्तिकेंद्री कथन म्हणून मी कादंबरीतील नायक संकल्पनेकडे पाहतो आहे.

उषा हस्तक यांनीही कादंबरीच्या आशयात 'व्यक्ती'ला महत्त्व दिले आहे. त्यांच्या मते, कादंबरीत व्यक्ती आणि समाज ह्यांच्यातील नाते अनेकविध संदर्भांच्या आधारे प्रस्थापित करता येते. 'व्यक्ती' ही समाजाचा एक घटक असते, त्यामुळे 'व्यक्ती'ला असणाऱ्या अनेकविध परिमाणांचा उपयोग कादंबरीत करता येतो. 'महायुद्धासारख्या व्यापक ऐतिहासिक घटनेपासून तो व्यक्तिव्यक्तीमधील नाजूक भावसंबंधाचा अंतर्भाव असणारे कोणतेही अनुभवविश्व कादंबरीच्या पटावर चित्रित करता येते... कादंबरीतील 'व्यक्ती'चित्रणाला व्यक्तिमन, स्थल, काल, समाज, संस्कृती इत्यादींची परिमाणे देता येतात.' (उषा हस्तक : १९९३ : २९)

म्हणजे मानवी जीवनव्यवहाराचे कोणतेही रूप आणि वास्तव जगातील व्यक्तीला असलेले कोणतेही परिमाण-उदा. मनाचे, बुद्धीचे, आयुष्याचे, प्रदेशाचे, निसर्गाचे, काळाचे, समाजाचे, संस्कृतीचे, इतिहासाचे- कादंबरीतील व्यक्तीला देता येतात. व्यक्तीच्या भोवतालचे समाजजीवन, काल, संस्कृती यांची परिमाणेही व्यक्तीच्या परिघातूनच कादंबरीत साकारता येते. दुसऱ्या शब्दांत, अशा अनेकविध परिमाणांचा उपयोग करण्याची क्षमता इतर साहित्यप्रकारापेक्षा कादंबरीतच जास्त असल्यामुळे कादंबरी प्रकार जास्त व्यक्तिलक्ष्यी ठरतो. म्हणूनच कादंबरीत कथानक, आशयासोबतच व्यक्तिचित्रण महत्त्वाचे ठरते, आणि हे व्यक्तिचित्रण कादंबरीच्या नायकाच्या माध्यमातून साधता येते. या नायकाच्या चित्रणाचे बदलत गेलेले स्वरूप हाच या निबंधाचा विषय आहे.

**स्वातंत्र्यपूर्व कादंबरीतील नायक**

मराठी स्वातंत्र्यपूर्व व स्वातंत्र्योत्तर कादंबरीतील नायकाचे चित्रण यात प्रचंड भेद आहे. उदा. तत्कालीन विनोचे कादंबरीकर ना. सी. फडके यांचा नायक कसा होता? नरहर कुरुंदकर सांगतात: हा नायक कुलीन, सद्गुणी, पराक्रमी नव्हता; लाघवी, मोहक, हसरा, मनमोकळा, दिलदार, नायिकेच्या ठिकाणी असणाऱ्या उत्कट आकर्षकत्वाचे व कुशल संभाषणाचे महत्त्व जाणणारा होता. जणू फडके आपल्या वाचकांना सांगत होते की, 'तुम्हाला प्रेमात पडावयाचे आहे ना, मग प्रेमात कसे पडावे आणि मोहक कसे बोलावे याचे शिक्षण माझी कादंबरी तुम्हाला देईल.' (नरहर कुरुंदकर: २०१०: १२९) म्हणजे दिलदार, आकर्षक असा नायक; ज्याच्या दृष्टीने आंतरजातीय विवाह म्हणजेच पुरोगामित्व होते. नायक-नायिकांच्या मनात गंड असणे, नायिका विधवा असणे, कोणाचे तरी एकाचे पहिले लग्न झालेले असणे, नायक देशभक्त असल्यामुळे तुरुंगात जाणे असे अडथळे आणि ते ओलांडणे- यांवर या नायकांचा भर होता.

हीच गोष्ट वि. स. खांडेकर व ग. त्र्यं. माडखोलकर यांच्या नायकांची. खांडेकरांनी 'ययाती' हा विसाव्या शतकातील भोगलंपट माणसाचा प्रतिनिधी म्हणून रेखाटला. महाभारतातील ययातीचे आकलन, त्या पुराणकथेतील गूढ अर्थ उलगडून दाखवणे हा त्यांचा हेतू नव्हता. माडखोलकरांच्या नायकाचीही तीच अवस्था आहे. त्यांनाही व्यक्तीच्या शोधापेक्षा वाचकसापेक्ष प्रणयोत्सुक नायक-नायिका महत्त्वाचे वाटत होते. त्यामुळे वाचकाला उद्दिपित करणारीच वर्णने त्यांच्या कादंबरीत यायची. याबाबत कुरुंदकरांचे मार्मिक अवतरण पाहावे-

'नारीदेहाच्या वर्णनात फडके गळ्याच्या खाली सहसा

उतरत नाहीत... माडखोलकरांचा शृंगार (मात्र) हा भोगाचा एक प्रकारच असतो. खांद्याला अभावित स्पर्श झाला आणि अंगात झिणझिण्या उठल्या या बायकी नाजूकपणावर माडखोलकरांचे समाधान नाही. दाहक उष्ण श्वास गालावर रेंगाळू लागले, ओठावर ओठ आघात करू लागले. सारे शरीर कुस्करू लागले. (नरहर कुरुंदकर: २०१०:१६०) असा माडखोलकरांचा शृंगार दणकट व शरीरनिष्ठ असतो. म्हणजे समाजजीवनातील व्यक्तीच्या आंतरिक शोधापेक्षा वाचकसापेक्ष, लैंगिकताप्रधान रंजनाला प्राधान्य देऊन नायक चितारणे हे स्वातंत्र्यपूर्व कादंबरीचे स्वरूप असल्याचे दिसते.

नायकाचे असे चित्रण होण्याची कारणे काय असावी? तर ती वाङ्मयीन व राजकीय असल्याची शक्यता कुरुंदकरांनी वर्तवली आहे. त्यांच्या मते, 'कलावादी कोल्हटकरांचा मराठी समीक्षेवर झालेला परिणाम रंजनात्मक वाङ्मयाला प्रतिष्ठा देणारा ठरला आणि दुसरी शक्यता अशी की म. गांधींच्या राजकारणामुळे सर्व वैचारिक विश्वच अधिक भोळेभावडे आणि श्रद्धाळू बनत गेले' (नरहर कुरुंदकर: २०१०:१६८) म्हणजे वाङ्मयीन कलावादामुळे व भावड्या राजकीय भूमिकेमुळे तशीच वाचकसापेक्षता निर्माण झाली. त्यातून कादंबरीतील चित्रण- पर्यायाने नायकाचे चित्रण असे भावडे, विसविशीत आणि रंजक झाले, असे म्हणता येते.

**स्वातंत्र्योत्तर कादंबरीतील नायक**

ही परिस्थिती मात्र स्वातंत्र्योत्तर कादंबरीत दिसत नाही; पण त्याचे कारण स्वातंत्र्य हे नसून दुसरे महायुद्ध हे आहे. दुसऱ्या महायुद्धानंतर मराठी कादंबरी कृत्रिमपणा सोडून अनुभवाच्या अस्सलपणाला जपू लागली. स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या दंगली आणि राजकारणामुळे ध्येयवादावद्दलची आसक्ती कमी झाली. १९४७ नंतर स्वातंत्र्याबद्दलचा भ्रमनिरास इतका झाला की, त्यामुळे देशभक्त नायक दाखवणे हौसच राहिली नाही. दुसरे असे की, स्वातंत्र्यानंतरचा कादंबरीचा वाचकवर्ग प्रचंड होता, सुशिक्षित होता; पण विशेष अभिरुचीचा नव्हता; त्याच्या रंजनाची भूक फडके- माडखोलकर यांना भागवणे शक्य नव्हते. शिवाय या काळातील दि. के. बेडेकर, वा. ल. कुलकर्णी आणि बा. सी मर्ढेकर यांच्या समीक्षेमुळे 'कलावादाच्या नावाखाली वावरणाऱ्या अतिरेकी रंजनवादाला आणि जीवनवादाच्या नावाखाली वावरणाऱ्या अतिरेकी बोधवादाला फार मोठा तडा गेला.' (नरहर कुरुंदकर: २०१०:१८५) अशाप्रकारे स्वातंत्र्योत्तर भ्रमनिरास, प्रचंड; पण अभिरुचीहीन वाचकवर्ग आणि निखळ वाङ्मयीन समीक्षा यांतून जसे नवकाव्य, नवकथा जशी जन्मास आली तशी नवकादंबरीही जन्मास आली.

तात्पर्य, दुसरे महायुद्ध, स्वातंत्र्योत्तर भ्रमनिरास, प्रचंड वाचक वर्गाची भूक आणि तत्कालीन समीक्षेने निर्माण केलेली नवअभिरुची यातून स्वातंत्र्योत्तर मराठी नवकादंबरीत नायकाच्या चित्रणाचे नवे संदर्भ पुढे आले. या नव्या चित्रणासाठी तत्कालीन मराठी कादंबरीकारांनी कादंबरी निर्मितीच्या भूमिकेतही बदल केला. काय होता हा बदल?

उषा हस्तक यांच्या मते, या काळात कादंबरीकारांनी सत्य जगाचा अनुभव देण्यासाठी आपल्या कल्पित सृष्टीतील घटकांची निर्मिती केली. (उषा हस्तक : १९९३ : २६) म्हणजे त्यांना सत्य-वास्तव सांगावयाचे होते; त्यासाठी कादंबरीत त्यांनी कल्पित जग उभारले; पण ते कल्पित असूनही सत्य वाटावे यासाठी कादंबरीच्या संघटनेत संभवनीयतेचे तत्त्व आणले. म्हणजे मानवी जीवनव्यवहाराचे जे रूप प्रत्यक्ष जगात अनुभवता येईल, संभवनीय असेल, त्याचाच प्रत्यय आणून देण्यासाठी त्यांची कल्पनाशक्ती काम करू लागली. त्यामुळे कादंबरीकाराच्या आणि वाचकाच्या जीवनविषयक अनुभवाची घडण करणारे एक समान जग कादंबरीत निर्माण झाले. सर्वसामान्य वाचकांच्याही गाठीशी वास्तव जगाचा अनुभव असल्याने ह्या कादंबरीचे आकलन त्यांना सहजपणे करता येऊ लागले.

याचा अर्थ स्वातंत्र्य पूर्व कादंबरीतील जग व नायक कल्पित आणि असंभवनीय होता तर, स्वातंत्र्योत्तर कादंबरीकाराचे जग व नायक हा कल्पितच; पण संभवनीय होता. प्रत्यक्ष जीवनव्यवहारातील आणि वाचकाच्या जीवनविषयक अनुभवाशी समांतर होता. उदा. 'गारंबीचा बापू'. हे कल्पित पात्र असूनही ते संभवनीय असल्याने कथानायक म्हणून प्रचंड प्रिय झाले कारण वाचकाच्या अनुभव-जगाशी ते समांतर होते.

**वास्तव सापेक्ष कल्पित नायक**

खरे म्हणजे रंजनपर वाङ्मयाच्या वाचकांना कथानायकाचे जे रूप भुरळ पाडते, तेच 'गारंबीचा बापू' (१९५२) या कादंबरीच्या नायकाला लाभलेले आहे. मात्र तो धाडसी, पराक्रमी तरुण आणि राधेचा निष्ठावान प्रियकर असा आहे. हा नायक कल्पित असला तरी त्याचे आकलन वाचकाला भोवतालच्या जगाच्या सापेक्षतेनेच, थेट जीवनानुभवातूनच झाले. कोकणातील एक जिवंत आणि वास्तव नायक म्हणून तो समोर आला. मुख्य म्हणजे पहिल्यांदाच मराठी कादंबरीत 'निसर्ग' हेही एक पात्र आले. मात्र हा निसर्ग वास्तव म्हणजे

वाचकाला प्रत्यक्ष अनुभवता येतो असा आहे, बालकवींच्या कवितेतील निसर्गासारखा कल्पित नाही. म्हणजे, कादंबरीकाराची संभवनीयतेची भूमिका, वास्तवाशी व वाचकाशी सापेक्ष राहणे, जीवनानुभवाशी समांतर राहणे आणि कल्पित वास्तवापेक्षा प्रत्यक्ष वास्तवाला सामोरे जाणे या प्रक्रियेतून स्वातंत्र्योत्तर कादंबरीतील नायक संकल्पना विकसित झाल्याचे दिसते. पुढे हा नायक समाजसापेक्ष असणेही कादंबरीकारांना महत्त्वाचे वाटले.

**समाजसापेक्ष नायक**

असा समाजसापेक्ष नायक 'आबा' पहिल्यांदा विभावरी शिरूरकरांच्या 'बळी' (१९५०) या कादंबरीत आला. हा नायक आपल्या समाजावरील गुन्हेगार जातीचा शिक्का पुसण्यासाठी धडपडतो. जातिभेद-अस्पृश्यता निर्मूलनात सहभाग घेतो. जातिभेदाची लढाई तो लढतो. त्याच्यावर गांधीवादा'चे संस्कार आहेत; मात्र ते खांडेकर-वरेरकरांच्या नायकांसारखे वरवरचे नाहीत. 'मी एका जातीत जन्माला आलो म्हणून मला माणूस म्हणून नाकारणे योग्य नाही' असे तो म्हणतो; आणि जातसापेक्ष भूमिकेपेक्षा व्यक्तीच्या 'माणूस' या भूमिकेला महत्त्व देतो. या नायकाच्या माध्यमातून विभावरीबाईंनी वंचित समाजाच्या व्यथा पहिल्यांदाच मराठी कादंबरीत आणल्या.

'फकिरा' (१९५९) कादंबरीत मांग समाजाच्या नायकाबरोबरच लोकजीवन, लोकसंस्कृती, बलुतेदारी, खेड्यातील गावगाडा, गाव व कामगार संघर्ष, इंग्रजांविरुद्ध दलितांनी आपल्या अस्मितेसाठी पुकारलेला प्रभावी लढा - याचे चित्रण येते. 'फकिरा' हा मराठी कादंबरीतील पहिला क्रांतिकारक नायक आहे. 'बळी'तील आबा विद्रोह करतो; पण तो यशस्वी होत नाही; मात्र फकिरा दारिद्र्य, विषमता, अन्याय आणि पारतंत्र्य अशा सर्वच शोषणाविरुद्ध सर्वांना सोबत घेऊन लढा देतो. क्रांती घडवण्याचा प्रयत्न करतो आणि यशस्वीही होतो.

मराठी कादंबरीतील हे दोन नायक जसे कृतिशील आणि समाजसापेक्ष आहेत, तसे काही नायक प्रदेशसापेक्षही आहेत. उदा. विशिष्ट प्रदेशातील मानवी जीवन, त्यांचे जगणे, त्यांच्या समस्या यांना सामोरे जाणारा नायक 'बनगरवाडी'त अवतरलेला आहे.

**प्रदेशनिष्ठ नायक**

'बनगरवाडी'तील (१९५५) राजाराम विठ्ठल सौदणीकर हा शाळामास्तर असलेला सामान्य नायक. बनगरवाडी सारख्या दुष्काळग्रस्त, मागासलेल्या भागात तो येतो. निसर्ग, प्रदेश आणि समाज असे तीन पैलू त्याच्या व्यक्तिचित्रणाला आहेत. आपल्या जाणिवेतून तो 'बनगरवाडी'चा अनुभव घेतो आणि जगण्याचे सहज अर्थ निवेदनातून व्यक्त करतो. या अगोदरच्या कादंबरीतील मास्तर-नायक ध्येयवादी असत आणि त्या चष्म्यातूनच जगाकडे पाहत कारण ते लेखकाच्या जीवन तत्त्वज्ञानाचे वाहक होते, तसा हा नायक नाही. समाजजीवनाविषयी त्याची तात्त्विक काही भूमिका नाही, तरी तो समाजनिष्ठ आहे. 'आता इथून पुढे हेच आपले गाव...चिमण्यांच्या विष्ठेने आणि चिलटांच्या वासाने भरलेली शाळा नावारूपाला आणायची' हेच त्याचे उद्दिष्ट आहे. या नायकाला व्यंकटेश माडगूळकर यांनी लेखकाच्या छाप्यातून मुक्त केले आणि थेट जीवनाच्या प्रांगणात उभे केले.

**संस्कृती संघर्ष आणि नायक**

'गोतावळा' (१९८५) मधील आनंद यादवांचा 'नारबा' हा ग्रामीण जीवनाच्या बदलत्या वास्तवात; आधुनिक यंत्रसंस्कृती आणि बदललेली कृषिसंस्कृती यांच्या संघर्षात आपले भावविश्व गमावून बसलेला हतबल नायक आहे. नारबाचा जीवनपट एका समृद्ध कृषी संस्कृतीच्या विनाशाची कथा आहे. त्यात अतिसामान्य माणसाच्या अंतर्मनाचा ठाव असून मानवाच्या काही चिरंतन वासना, भावना व समस्या आहे. चंद्रकांत बांदिवडेकरांच्या मते, 'नारबा एका बाजूने, निराधार, एकटा आणि दुबळा जीव आहे, तर दुसऱ्या बाजूने त्याने आपल्या एकटेपणाची खाई आपल्या गुरा-ढोरांवरच्या अव्याज आपुलकीने भरून टाकली आहे.' (चंद्रकांत बांदिवडेकर: १९८३: २१५) या कादंबरीत प्राण्यांची एकमेकांशी असलेली नाती आणि त्यांचे नारबाशी व त्याच्या जमिनीशी असलेले भावबंध आहेत. हे प्राणीसुद्धा आपल्या स्वतंत्र व्यक्तिमत्त्वाची छाप ठेवून जातात. तात्पर्य, व्यंकटेश माडगूळकरांची 'सत्तांतर' आणि आनंद यादवांची 'गोतावळा' या दोन कादंबऱ्यांनी मराठी नायकाच्या परिघात प्राण्यांनाही आणून ठेवले आहेत.

**मानसशास्त्राचा प्रभाव - नायकनिष्ठ मनोविश्लेषण**

याच काळात सिग्मंड फ्रॉइड आणि इतर मानसशास्त्रज्ञांच्या संशोधनाचा कादंबरी वाङ्मयावर व पर्यायाने नायक चित्रणावर परिणाम पडल्याचे दिसते. त्यामुळे मानवी नीतीविषयक मते, लैंगिकतेकडे पाहण्याचा दृष्टिकोन बदलून गेला. अव्यवस्थित व स्खलनशील व्यक्तींबद्दल सहानुभूतीची भावना वाढीस लागली. दुर्बल, अस्वस्थचित्त, सुमार, कामुक व्यक्तींना नायक-नायिका दाखवून त्यांच्या माध्यमातून मानवी अंतर्मनाची गहनगूढ धडपड दाखवण्याचा लेखक

प्रयत्न करू लागले. ज्याचे चित्रण वसंत कानेटकर, पुढे चि. त्र्यं. खानोलकर, जयवंत दळवी यांच्या कादंबऱ्यांत आले.

मानसशास्त्राच्या प्रभावामुळे नायकचित्रण ही संकल्पना कमालीची बदलली: चंद्रकांत बांदिवडेकरांच्या मते, 'मनुष्याचे मूळ रूप शोधण्याच्या प्रयत्नात चरित्रचित्रण करण्याची जुनी पद्धत बदलून गेली. व्यक्ती चांगली किंवा वाईट अशी नसते. चांगल्या वाईट प्रवृत्तींची भेसळ तिच्यामध्ये असते असे मान्य झाल्यावर सुष्ट किंवा दुष्ट अशा प्रकारची एकेरी रूपे निरस वाटू लागली आणि माणसाचे संमिश्र रूप व्यक्त करण्याकडे प्रवृत्ती वाढली. कधी व्यक्ती विकृत व गूढ दाखवण्याकडे व खरे रूप समजण्याकडे काळ झुकू लागला...लेखक आपल्या कथांपासून व चित्रणापासून इतका दूर राहण्याचा प्रयत्न करू लागला, जसा ईश्वर आपण रचलेल्या सृष्टीपासून दूर असतो. आपल्या पात्रांच्या मनोवेदना आणि संवेदना वाचकांनी सरळ अनुभवाव्यात अशा तऱ्हेचा प्रयत्न होऊ लागला.' (चंद्रकांत बांदिवडेकर: १९८३:३९) एकूण काय, तर लेखक व नायक यांच्या संबंधात अंतर पडले आणि नायक व वाचक यांच्यातील पारंपरिक कथनपद्धतीत असलेली दरी कमी झाली.

**कादंबरी-नायकाचे अंतर्मन : बा. सी. मर्ढेकर**

हीच पार्श्वभूमी घेऊन मर्ढेकरांच्या 'रात्रीचा दिवस' (१९४८) मधील नायक दिक्पाल अवतरला आहे. जेम्स जॉईसच्या 'युलिसिस' या संज्ञाप्रवाही कादंबरीवरून मर्ढेकरांनी ही प्रेरणा घेऊन मराठीत पहिली संज्ञाप्रवाह कादंबरी आणली. मानवी जीवनाच्या व व्यक्तीच्या शोधापेक्षा अंतर्मन व त्याचा संज्ञाप्रवाह शोधणे हेच मर्ढेकरांचे प्रयोजन होते. या कादंबरीतील कालावधी संध्याकाळी सात ते दुसऱ्या दिवशी सकाळी नऊपर्यंत असा सुमारे चौदा तासांचा आहे. कमी कालावकाशातील नायक हाही मराठी कादंबरीतील एक नवाच प्रयोग होता. हे पात्र पुन्हा लेखक-सापेक्षच आहे. विजया राजाध्यक्षांच्या मते, 'दिक्पाल हे मुख्य स्वभावचित्र मर्ढेकरांच्या पिंड प्रकृतीतील वैशिष्ट्ये अंगी वागवणारे आहे.' (विजया राजाध्यक्ष: २००८: २२) तात्पर्य, कवितेत जसे कवी मर्ढेकर सापडतात तसे कादंबरीत नायकाच्या रूपातही सापडतात. दिक्पाल हा संपादक होण्याची स्वप्ने पाहतो. त्याच्या या भावनेच्या प्रकटीकरणात भाषेचा संज्ञाप्रवाह आहे. 'टिक, टिक, टिक- खट, खट, खट-टिकर, टिकर - it is now disclosed... राखून..राख..ऊन-उन राख कुठली, गार राख कुठली!' अशा भाषिक रचनेतून नायकाचे असंज्ञ मन समोर येते.

> **"मराठी कादंबरीची निर्मिती, प्रसार आणि वाचन या तिन्ही प्रक्रियांवर पाश्चात्त्य संस्कृतीचा प्रभाव पडलेला आहे. मुद्रणामुळे लेखकाचा आश्रयदाता बदलला. वाचणाऱ्या वर्गात कादंबरीचा प्रसार झाला. वाचकाचे स्वरूपच बदलल्यामुळे पारंपरिक कथनरूपातही बदल झाला. 'आपल्या पारंपरिक कथन पद्धतीत, कल्पित निवेदक कल्पित श्रोत्याला कथा सांगत असे आणि भोवतालच्या खऱ्याखुऱ्या वाचकापासून आणि वास्तवापासून कथनरूप सुरक्षित अंतरावर ठेवत असे. मात्र इंग्रजीच्या प्रभावातून, कथाबाह्य असलेला वाचक कथनरूपाच्या संरचनेच्या दृष्टीने महत्त्वाचा ठरू लागला (थोरात हरिश्चंद्र: २०१०: ५) तात्पर्य, इंग्रजी संपर्कामुळे कथन पद्धतीत बदल झाला आणि त्यातून कादंबरीची संरचना व्यक्तिसापेक्ष-वाचकसापेक्ष झाली."**

**बिशू - असतेपणाकडून घडतेपणाकडे प्रवास**

शरश्चंद्र मुक्तिबोधांनी मर्ढेकरांच्या आकृतिवादी, सौंदर्यवादी व व्यक्तिवादी लयसिद्धांताला जीवनवादी, समाजसापेक्ष 'मानुषतेच्या सिद्धांता'चा पर्याय दिला आहे. या सिद्धांतानुसार, मनुष्याने निसर्गाशी द्वंद्व म्हणजे संघर्ष करूनच त्याचा भौतिक विकास केला आहे. या द्वंद्वात त्याच्या मनात निसर्गापासून तुटलेपणाची भावना आणि त्यातून व्याकुळता निर्माण होते. या व्याकुळतेचे मूळ माणसाच्या नैसर्गिक 'असतेपणा'च्या जाणिवेमध्ये असते. या जाणिवेसच 'बीइंग' (Being) आणि द्वंद्वनिष्ठ, संघर्षमय विकासास 'बिकमिंग' (Becoming) असे त्यांनी म्हटले आहे. त्यांच्या मते, मानवी अस्तित्वाचा प्रवास हा 'बीइंग' (Being) कडून 'बिकमिंग' (Becoming) कडे-असतेपणाकडून घडतेपणाकडे होत असतो, आणि हाच प्रवास आपल्या बिशू या कादंबरी नायकाच्या माध्यमातून मुक्तिबोधांनी साकारला आहे. बिशूचा हा प्रवास 'क्षिप्रा', 'सरहद्द', आणि 'जन हे वोळतु जेथे' या कादंबरीत्रयातून अस्तित्वाकडून समाजसापेक्षतेकडे जातो आहे. मराठीत पहिल्यांदाच असे

एका नायकाचे कादंबरीत्रय आले आहे. पुढे नेमाड्यांनी 'चांगदेवचातुष्ट्य' आणले आहे. त्यात चांगदेव हा एकच नायक येतो; मात्र त्याचा प्रवास 'बिढार' ते 'हिंदू' असा समाजसापेक्षतेकडून संस्कृतिसापेक्ष होतो आहे. 'कोसला'तील पांडुरंग समाजात राहूनही परात्मतेच्या जाणिवेत गुरफटलेला आहे, मात्र त्याचा पुढचा प्रवास बिशूसारखा समाजाकडे किंवा चांगदेवसारखा संस्कृतीकडे जात नाही. तो त्यातच अडकून पडतो. त्यामुळेच नेमाड्यांना 'कोसला' पुढील चार कादंबरीत नायक बदलावा लागला आहे.

**परात्म नायक**

समाजात राहूनही परात्मतेत गुरफटलेला दुसरा नायक म्हणजे बॅ. अनिरुद्ध धोपेश्वरकर (१९६७). हा नायक कधी स्वत:शीच बोलतो, कधी मित्रासारखा आपल्याशी बोलतो. कधी संवादातून प्रसंगचित्र उभे करतो, तर कधी निवेदकाची भूमिका घेऊन तृतीयपुरुषी निवेदनही करतो. द. भि. कुलकर्णी यांच्या मते, 'नायका'चे व्यक्तिदर्शन हे कादंबरीचे प्रतिपाद्य नाहीच. नायकाचे व्यक्तित्व आणि उरलेले सारे जग यांच्यातील 'रुंद दरी', यांच्यातील सर्वव्यापी विसंवाद-एकूण मानवी जीवनाचेच विसंवादी रूप- हे कादंबरीचे प्रतिपाद्य आहे.' (द. भि. कुलकर्णी: २०१० :५४) या नायकाला मानवी अस्तित्वविषयक प्रश्न पडतात. तो निराश होतो. वकिली, शिष्टाचार सोडतो, अखेरीस बायकोही सोडतो; उपऱ्या, मूल्यविरहीत जगात जगतो. या कंटाळ्यातून सुटका व्हावी म्हणून तो कुठलीही लहान-मोठी, विनोदी-गंभीर कृती करावयास तयार असतो. 'बॅरिस्टर जे मानवी मनांचे, वर्तनाचे विश्व पाहतो त्यात स्वाभाविक, धर्म, न्याय नीती, तर्क, सत्य यांना खरोखर काडीचेही स्थान नसते...हेच या जीवनाचे रूप असते. जीवनातील या दांभिकतेपुढे, अनाचारापुढे, मूल्यविटंबनेपुढे आपण अंगिकारलेला 'गुन्हा' गुन्हा नव्हेच; असे बॅरिस्टरला वाटते.' (द. भि. कुलकर्णी :२०१०:५६) तात्पर्य, बॅरिस्टरचे निवेदन हा कादंबरीच्या कथन पद्धतीतील नवाच बदल आहे. तसेच नायकाची सामाजिक दांभिकतेपुढे आपला गुन्हा काहीच नाही, अशी नवनैतिक भूमिका आहे.

डॉ. भालचंद्र नेमाडे यांच्या मते, अशा नायकांच्या कादंबरीचा हा नवाच गट आहे. यात त्यांनी 'बॅ. अनिरुद्ध धोपेश्वरकर', 'निष्पर्ण वृक्षावर भर दुपारी', 'सात सक्क त्रेचाळीस', 'स्रोत' या कादंबऱ्यांचा समावेश केला आहे. त्यांच्या मते, 'या नायकांना परात्मवादाने पछाडलेले आहे. स्वत:च्या अंगी सद्गुण आहेत असे हे नायक मानत नाहीत. सर्व सामाजिक मूल्यांना हे नायक अव्हेरतात. ते सामाजिक रोगांचे निदान करतात, त्यावर उपाय सुचवत नाहीत...ह्या नायकांना कृती नको आहे कारण समाजातील वातावरणच अनैतिक असल्यामुळे अशा वातावरणात कोणतीही कृती अनैतिक ठरू शकते.' (भालचंद्र नेमाडे: २००१: २२३) खुद्द नेमाड्यांचा पांडुरंग सांगवीकर हा असाच परात्म नायक आहे. तात्पर्य नैतिक; पण समाजापासून परात्म आणि कृतिशून्य नायक ही नवीच संकल्पना मराठी कादंबरीत भाऊ पाध्ये, नेमाडे, ह. मो. मराठे, किरण नगरकर यांनी आणली आहे, हे दिसते.

'कोसला' (१९६३) कादंबरीत एका साध्या, सामान्य; पण विलक्षण संवेदनशील व चिंतनशील अशा न-नायकाची ही कहाणी आहे. तो उदात्त नाही, पराक्रमी नाही. त्याच्या वाट्याला येणाऱ्या घटना या कुणाही सामान्य माणसाच्या वाट्याला येतील अशा आहेत. नायक पांडुरंग पुरुषप्रधान आणि ग्रामीण अशा दोन्ही संस्कृतीत तो वाढला आहे. त्याला मोठे ध्येय नाही. पैसा, प्रेम, प्रतिष्ठा, महत्त्वाकांक्षा नाही. तो उनाड, चैनी, उथळ नाही; पण पैशाच्या मागे लागून जगणाऱ्यांचा त्याला तिटकारा आहे. पांडुरंगाला जगण्याचा कंटाळा येतो. त्याला जीवन निरस, भंकस वाटू लागते.

**आजची मराठी कादंबरी आणि नायक**

साठोत्तरी मराठी कादंबरीतील नायक संकल्पनेला नवे वळण देणारे कादंबरीकार म्हणून भाऊ पाध्ये, भालचंद्र नेमाडे, विलास सारंग, श्याम मनोहर इत्यादी कादंबरीकार समोर येतात. ही कादंबरी, सामाजिक वास्तव व मानवाचे नैतिक प्रश्न उपस्थित करणारी आहे. नायकाच्या चित्रणाच्या सर्व कल्पना धुडकवणारी आहे. इथे आणखी एक निरीक्षण नोंदवावेसे वाटते की, स्वातंत्र्योत्तर कादंबरीत व्यक्तीला स्थान होते म्हणजे नायक व्यक्तिसापेक्ष व लेखकसापेक्ष होता. साठोत्तरी कादंबरीत समाजाला स्थान होते म्हणजे नायक समाजसापेक्ष व वाचक सापेक्ष होता. नव्वदोत्तरी कादंबरीत मात्र असे दिसत नाही. तिच्यात ना पूर्ण व्यक्ती आहे, ना पूर्ण समाज आहे; ना ती पूर्ण लेखकसापेक्ष आहे, ना ती पूर्ण समाजसापेक्ष, ना ती पूर्ण वाचकसापेक्ष आहे. तिच्यात या तिन्हीचेही मिश्रण आहे असे फार तर म्हणता येईल. एकच एक कथानक किंवा एखादी व्यक्तिरेखा ठळक न करता कथनाचे कोलाज उभे केले जातात. कादंबरी नायकाच्या चित्रणाचे हे नव्वदोत्तरी संदर्भ आहेत. ते तसे का बदलले? तर ते जागतिकीकरणाच्या प्रक्रियेमुळे आणि उत्तर आधुनिक तत्त्वज्ञानामुळे.

जागतिकीकरणामुळे मानव, लेखक व समाजाच्या अस्तित्वाचाच लोप झालेला आहे. लेखकाचे-समाजाचे विघटन झालेले आहे. आधुनिक साहित्यात- म्हणजे

स्वातंत्र्योत्तर साहित्यात सामाजिक बांधिलकी आणि लेखकाच्या व्यक्तित्वाचा आग्रह होता. म्हणून व्यक्ती व समाज कादंबरीत आला. नायकसापेक्षतेने बोलायचे झाले, तर व्यक्तिकेंद्री व समूहकेंद्री नायक साठपर्यंत दिसून येतो. नव्वदोत्तरी उत्तरआधुनिक साहित्यात मात्र समाज आणि व्यक्तित्व यांना टाळून साहित्य समोर आल्याचे दिसते. उदा. 'हे ईश्वरराव, हे पुरुषोत्तमराव', किंवा 'शीतयुद्ध सदानंद' मधील नायक. या नायकांना त्यांच्या लेखकांनी संस्कृतिनिरपेक्ष केले आहे. त्यांची कोणती एक विशिष्ट संस्कृती समोर येत नाही. संस्कृतीच नाही, तर मूल्ये कशी राहतील? उत्तरआधुनिकतेत व्यक्ती व समूह या दोन्ही मूल्यांना महत्त्व राहत नाही. उत्तरआधुनिक तत्त्वज्ञान आधीच्या सर्व तत्त्वज्ञानाचा आणि मूल्यांचा अंत (death) घडवून आणते.

आधुनिक काळात, लेखक हा पिता व लेखन त्याचे अपत्य मानले जात होते. त्यामुळे साहित्याच्या केंद्रस्थानी लेखक व त्याचे व्यक्तित्व असायचे. फ्रेंच कवी मलार्मे याने लेखकाच्या जागी भाषेला केंद्रस्थानी आणले. रोलाँ बार्थ याने 'लेखकाचा अंत' ही संज्ञा मांडली आहे. बार्थने लेखकाची सर्वसाक्षी व सर्वव्यापी उपस्थिती नाकारत वाचकाला महत्त्वाचे स्थान मिळवून दिले. वाचकाने संहितेचे सर्व धागेदोरे धरून ठेवलेले असतात, वाचकाचा जन्मच मुळी लेखकाच्या अंतातून होतो, अशी त्याची संकल्पना आहे. (संज्ञा संकल्पना कोश, २८६)

तात्पर्य, लेखकाचा अंत, भाषेचे स्वतंत्र अस्तित्व आणि वाचकाला अनन्यसाधारण महत्त्व यामुळे उत्तर आधुनिक कादंबरीत नायक संकल्पना पूर्ण बदलली; किंबहुना ती राहिलीच नाही. श्याम मनोहर, विलास सारंग, विश्राम गुप्ते, दिनानाथ मनोहर, राजन गवस, रंगनाथ पाठारे, प्रवीण बांदेकर इत्यादींच्या कादंबरीत हे दिसून येते. संस्कृती आणि तिच्यातील विशिष्टतेची प्रक्रियाच जागतिकीकरणाने घालवली आहे. ही प्रक्रिया आधी आर्थिक मग सामाजिक- सांस्कृतिक आणि आता वाङ्मयीन बनली, त्यामुळे आजच्या कादंबरीत चित्र रेखाटण्याजोगा नायक सापडत नाही. याला अपवाद भालचंद्र नेमाडे यांचा चांगदेव-खंडेराव आहे कारण या उत्तरआधुनिक विघटनाच्या व सपाटीकरणाच्या विरुद्धची प्रतिक्रिया म्हणून देशीवादातून आपले स्वतंत्र अस्तित्व जोपासण्याची तीव्र धडपड त्यांच्या नायकांत दिसते. देशीवादाचे रूपच आक्रमकपणे याला टक्कर देऊ शकेल असे त्यांना वाटते. त्यामुळे आपली पारंपरिक सांस्कृतिक मूल्ये जोरकसपणे पुढे आणण्याचा प्रयत्न करत नेमाडे यांचा खंडेराव हा नायक हा पुन्हा सांस्कृतिक शोधाकडे जातो आहे.

**समारोप**

अशाप्रकारे कथन पद्धतीत बदल झाल्यामुळे कादंबरीची संरचना व्यक्तिसापेक्ष-वाचकसापेक्ष झाली. व्यक्ती, व्यक्तिवाद, नव्या जगाचे भान, कल्पित कथनाचे वाचकसापेक्ष कथन होणे-यातून नायक संकल्पना विकसित होत गेली आहे. वाचकसापेक्ष, लैंगिकताप्रधान, कल्पित; पण संभवनीय, समाजसापेक्ष, क्रांतिकारक, प्रदेशसापेक्ष, प्राणिसापेक्ष, संज्ञाप्रवाही, परात्म नायक अशी ही नायक संकल्पना स्वातंत्र्यपूर्व, स्वातंत्र्योत्तर, साठोत्तरी आणि नव्वदोत्तरी अशी काळानुसार बदलली आणि आज नायक-संकल्पना व्यक्ती, समाज यांच्या विघटनाकडून ते उत्तरआधुनिक आणि देशीवादी या टोकापर्यंत येऊन पोचली आहे.

**संदर्भ सूची**


- कुरुंदकर नरहर, २०१० : धार आणि काठ, (पा. आ). देशमुख आणि कंपनी, पुणे
- कुलकर्णी द. भि, २०१० : कादंबरी: स्वरूप व समीक्षा, (दु. आ.) पद्मगंधा प्रकाशन, पुणे
- देशपांडे कुसुमावती, १९७५ : मराठी कादंबरीचे पहिले शतक,(दु. आ) मुंबई मराठी साहित्य संघ, मुंबई
- नेमाडे भालचंद्र, २००१ : टीकास्वयंवर, साकेत प्रकाशन, औरंगाबाद
- थोरात हरिश्चंद्र, २०१० : कादंबरीविषयी, (दु. आ.) पद्मगंधा प्रकाशन, पुणे
- थोरात हरिश्चंद्र, २०१० : कादंबरी : एक साहित्यप्रकार, शब्द पब्लिकेशन, मुंबई
- बांदिवडेकर चंद्रकांत: १९८३ : मराठी कादंबरी : चिंतन आणि समीक्षा, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे
- राजाध्यक्ष विजया, २००८ : मराठी कादंबरी : आस्वादयात्रा (संपा), पॉप्युलर प्रकाशन, मुंबई
- हस्तक उषा, १९९३ : कादंबरी आणि मराठी कादंबरी, साहित्यसेवा प्रकाशन, औरंगाबाद
- लेख
- दिगंबर पाध्ये: २००८ : बनगरवाडी, मराठी कादंबरी : आस्वादयात्रा (संपा विजया राजाध्यक्ष) , पॉप्युलर प्रकाशन, मुंबई


●


**डॉ. देवानंद सोनटक्के**
सहा. प्राध्यापक, मराठी विभाग
दहिवडी कॉलेज, दहिवडी, जि. सातारा
इ-मेल : anandsonu23@gmail.com
चलभाष : ९८६०२६३१६३



लेख

**नामदेव गपाटे**

# दिगंबर पाध्ये यांचे समीक्षालेखन

गंबर पाध्ये हे मराठी साहित्याचा समाजशास्त्रीय दृष्टिकोनातून विचार करणारे महत्त्वाचे समीक्षक होते. त्यांचा जन्म २४ जून १९३९ रोजी रत्नागिरी जिल्ह्यातील पाथर्डी येथे झाला. त्यांनी प्राथमिक शिक्षण मुंबई येथील राममोहन इंग्लिश स्कूलमधून पूर्ण केले. पुढे त्यांनी इंटरनंतर बी.ई.एस.टी.मध्ये सात वर्षे नोकरी केली. त्यानंतर १९६६ साली रूपारेल महाविद्यालयातून सुवर्णपदकासह बी.ए.ची पदवी प्राप्त केली. तसेच १९६९ मध्ये मुंबई विद्यापीठामधून पदव्युत्तर शिक्षण पूर्ण केले. तेथेही त्यांनी बी.ए.प्रमाणेच सुवर्णपदक मिळविले. साहित्याची उपजतच आवड असल्यामुळे त्यांनी बी.ए., एम.ए.च्या शिक्षणासाठी मराठी साहित्य हाच विषय निवडला. एम.ए.नंतर पुढे १९७१-७२ पासून ते पार्ले महाविद्यालयात (आताचे साठ्ये महाविद्यालय) अध्यापक म्हणून रुजू झाले. अध्यापनासोबत साहित्य आणि समीक्षाव्यवहारात कार्यरत राहतानाच त्यांनी १९६६ पासून वसंत दावतर यांच्या 'आलोचना' या नियतकालिकाचे सहसंपादक म्हणून काम पाहिले. त्यांचबरोबर त्यांनी साहित्य, समाज आणि संस्कृती यांच्यातील अनेक ताण उलगडून दाखविणारे महत्त्वपूर्ण समीक्षालेखन केले आहे.

त्यांचे हे समीक्षालेखन नारायण सुर्वे यांची कविता (१९८२), साहित्य, समाज आणि संस्कृती (१९९८), अवलोकन : मराठी समीक्षा आणि साहित्य (२०१२) या ग्रंथांमधून प्रसिद्ध झाले आहे. नारायण सुर्वे यांची कविता (१९८२ ) या ग्रंथाचा अपवाद सोडला, तर त्यांचे बहुतेक लेखन नैमित्तिक स्वरूपाचे आहे. साहित्य, समाज आणि संस्कृती (१९९८), अवलोकन : मराठी समीक्षा आणि साहित्य (२०१२) या तिन्ही ग्रंथामधील लेखनाचे स्वरूप हे आलोचना, समाज प्रबोधन पत्रिका, ललित, लोकवाङ्मय आदी नियतकालिकांमधून वेगवेगळ्या निमित्ताने लिहिलेले लेख, वेगवेगळ्या चर्चासत्रांत सादर केलेले निबंध अशा स्वरूपाचे आहे. त्याचबरोबर त्यांनी नारायण सुर्वे यांच्या समग्र कविता (नारायण सुर्वे), ज्वालेचे फूल : शरच्चंद्र मुक्तिबोध : व्यक्ती आणि वाङ्मय (रणधीर शिंदे) आदी ग्रंथांना अभ्यासपूर्ण प्रस्तावना लिहिल्या आहेत. त्यांचं हे लेखन मोजकेच असले तरी मराठी साहित्याचे समाजशास्त्र समजून घेण्याच्या दृष्टीने ते महत्त्वपूर्ण आहे. त्यांनी आपल्या समीक्षा लेखनाच्या निमित्ताने साहित्य, समाज, संस्कृती मार्क्सवाद, आदी संकल्पनांचे तात्त्विक विवेचन केले आहे. त्याचबरोबर नारायण सुर्वे, नामदेव ढसाळ, पु. भा. भावे, विभावरी शिरुरकर, वि. स. खांडेकर, विजय तेंडुलकर, कुसुमाग्रज, श्री. म. माटे आदी साहित्यिकांच्या साहित्यकृतींची उपयोजित समीक्षा केली आहे. दि. के. बेडेकर, बा. सी. मर्ढेकर, गो. वि. करंदीकर, वसंत दावतर, गो. मा. पवार यांचे मराठी साहित्यसमीक्षेतील स्थान महत्त्व अधोरेखित करण्याचा प्रयत्न केला आहे. त्यानिमित्ताने त्यांनी समकालीन साहित्यसंस्कृतीशी निगडीत विविध प्रश्नांची चर्चा केली आहे.

वर उल्लेख केल्याप्रमाणे दिगंबर पाध्ये यांच्या कोणत्याही लेखनाचे स्वरूप सलग ग्रंथाचे नाही. त्यांची समीक्षा म्हणजे वेगवेगळ्या चर्चासत्रांच्या निमित्ताने वेगवेगळ्या वाङ्मयीन प्रश्नांवर केलेले नैमित्तिक स्वरूपाचे भाष्य आहे. अशा पद्धतीने कोणत्याही लेखकाने वेळोवेळी केलेल्या लेखनातून त्याने व्यक्त केलेले विचार व काही वाङ्मयीन आणि वाङ्मयबाह्य प्रश्नांची त्यांनी शोधलेली उत्तरे त्याचे संकलन यालाच त्या साहित्यचिंतकाचा संपूर्ण साहित्यविचार समजणे म्हणजे त्या साहित्यिकांच्या वाङ्मयीन आकलनावर मर्यादा घालणारे ठरेल. केवळ अशा संकलनातून कोणत्याही साहित्यिकाचे कोणतेही

■ ■ दिगंबर पाध्ये यांच्या कोणत्याही लेखनाचे स्वरूप सलग ग्रंथाचे नाही. त्यांची समीक्षा म्हणजे वेगवेगळ्या चर्चासत्रांच्या निमित्ताने वेगवेगळ्या वाङ्मयीन प्रश्नांवर केलेले नैमित्तिक स्वरूपाचे भाष्य आहे. अशा पद्धतीने कोणत्याही लेखकाने वेळोवेळी केलेल्या लेखनातून त्याने व्यक्त केलेले विचार व काही वाङ्मयीन आणि वाङ्मयबाह्य प्रश्नांची त्यांनी शोधलेली उत्तरे यांचे संकलन यालाच त्या साहित्यचिंतकाचा संपूर्ण साहित्यविचार समजणे म्हणजे त्या साहित्यिकाच्या वाङ्मयीन आकलनावर मर्यादा घालणारे ठरेल. केवळ अशा संकलनातून कोणत्याही साहित्यिकाचे कोणतेही मूल्यमापन करणे शक्य होणार नाही; परंतु वेगवेगळ्या वेळी आपल्या लेखनातून त्या साहित्यचिंतकाने व्यक्त केलेल्या मतांमध्ये काही संगती जाणवते का? त्याद्वारे त्या साहित्यिकाची साहित्यविषयक काही भूमिका स्पष्ट होते का? या प्रश्नांची चर्चा करणे, उत्तर शोधणे मात्र शक्य आहे. या दृष्टिकोनातून दिगंबर पाध्ये यांच्या समीक्षालेखनाकडे पाहू जाता पाध्ये यांनी वेळोवेळी केलेल्या लेखनात एकप्रकारची सुसंगती जाणवते. त्यातून एक विचारसरणी व्यक्त होताना दिसते. ती खोल व सर्वांगीण असे समाजशास्त्रीय संस्कार घेऊन व्यक्त होताना दिसते. ■ ■

मूल्यमापन करणे शक्य होणार नाही; परंतु वेगवेगळ्या वेळी आपल्या लेखनातून त्या साहित्यचिंतकाने व्यक्त केलेल्या मतांमध्ये काही संगती जाणवते का? त्याद्वारे त्या साहित्यिकाची साहित्यविषयक काही भूमिका स्पष्ट होते का? या प्रश्नांची चर्चा करणे, उत्तर शोधणे मात्र शक्य आहे. या दृष्टिकोनातून दिगंबर पाध्ये यांच्या समीक्षालेखनाकडे पाहू जाता पाध्ये यांनी वेळोवेळी केलेल्या लेखनात एकप्रकारची सुसंगती जाणवते. त्यातून एक विचारसरणी व्यक्त होताना दिसते. ती खोल व सर्वांगीण असे समाजशास्त्रीय संस्कार घेऊन व्यक्त होताना दिसते.

दिंगबर पाध्ये यांनी मराठी साहित्याची विविधांगी समीक्षा केली असली तरी त्यांना मार्क्सवादी विचारसरणीचे विशेष आकर्षण होते. त्यांच्या संपूर्ण समीक्षालेखनातून मार्क्सवादी विचारव्यूह अधिक प्रकर्षाने कार्यरत असल्याचे दिसून येते. हे त्यांच्या नारायण सुर्वे यांची कविता (१९८२) या ग्रंथातून प्रकर्षाने जाणवते. त्यांनी मराठीतील मार्क्सवादी साहित्य सिद्धांत साहित्याची समाजसंबद्धता आणि मार्क्सवादी दृष्टिकोन या लेखांमधून मराठी वाचकांना मार्क्सवादी समीक्षा विचाराची तोंडओळख करून दिली आहे. त्याचबरोबर या निमित्ताने मराठी साहित्याच्या या संदर्भातील काही मर्यादाही त्यांनी नोंदवल्या आहेत. त्यांनी आपल्या लेखनातून साहित्याच्या संदर्भात पाया व अतिरचना या मार्क्सवादातील सिद्धांताचा असणारा संबंध व त्याचे स्वरूप यांची विस्ताराने चर्चा केली आहे. तसेच आधुनिक काळातील साहित्याचा बाजारपेठेशी संबंध आल्यामुळे साहित्य व्यवहारावर होणारे बरे वाईट परिणाम या विषयीची चर्चा त्यांच्या लेखनातून आली आहे.

पाश्चात्त्य किंवा भारतीय साहित्यशास्त्रांमध्ये मार्क्सवादी साहित्यसिद्धांताचे जे रूप दिसते ते मार्क्सने कोणत्यातरी कलास्वरूपशास्त्राची मांडणी करण्याच्या हेतूने मांडलेले नाही, तर संपूर्ण मार्क्सवादी सिद्धांत हा मानवी समाजाच्या निरनिराळ्या अवस्थांचे स्पष्टीकरण करणे व या अवस्थांच्या अपेक्षित बदलाला चालना देणे या गरजेतून निर्माण झाला आहे. याच्या अनुषंगाने विवेचन करत असताना मार्क्सने साहित्य व कला याविषयी जो विधाने केली आहेत त्याचे विकसित व विस्तारित रूप म्हणजे आजचा मार्क्सवादी साहित्यसिद्धान्त होय. हेच आशयसूत्र केंद्रभागी ठेवून पाध्ये यांनी पाश्चात्त्य मार्क्सवादी साहित्यसिद्धान्ताच्या विकासाची संहिता व मतमतांतराची चिकित्सा केली आहे. त्यांनी आपल्या लेखनामध्ये सार रूपाने साहित्याभ्यासाच्या समाजशास्त्रीय व मार्क्सवादी दृष्टिकोनाची काही वैशिष्ट्ये अधोरेखित केली आहेत. साहित्य आणि समाज यांमधील संबंधांना मान्यता देऊन त्यामधून मिळणाऱ्या मर्मदृष्टीतून साहित्य आणि समाज यांचे स्वरूप पाहणे, साहित्यनिर्मिती आणि आस्वाद यांची अलौकिकतावादातून मुक्तता करणे आणि मार्क्सवादी दृष्टीने वाङ्मयेतिहासाचे स्पष्टीकरण करणे. (दिगंबर पाध्ये : २०१२ : २०) साहित्याभ्यासाच्या समाजशास्त्रीय व मार्क्सवादी दृष्टिकोनाची हीच सूत्रे त्यांच्या सबंध समीक्षा लेखनाच्या मुळाशी कार्यरत आहेत.



अनुक्रमणिका

दिगंबर पाध्ये यांनी मराठी समीक्षेमध्ये लालजी पेंडसे यांच्या निमित्ताने सुरू झालेली मार्क्सवादी साहित्यसमीक्षेची परंपरा बा. रं. सुंठणकर, गं. बा. सरदार, दि. के. बेडेकर, शरच्चंद्र मुक्तिबोध यांच्यापर्यंत उलगडून दाखवली आहे. या निमित्ताने दिगंबर पाध्ये यांनी वाङ्मयेतिहासाच्या मांडणी बरोबरच साहित्यसिद्धांताचीही चिकित्सा केली आहे. माणूस हा आत्मभान असणारा आणि आपल्या शक्तींना वस्तुरूपात प्रत्यक्ष करणारा असा सामाजिक प्राणी आहे. त्याच्या सर्व शक्ती सामाजिकतेनुसार घडविलेल्या असतात. माणसाचे जगणे कितीही परात्म आणि निकृष्ट असले तरी त्यातून मुक्त होण्याची व सर्जनाची क्षमता माणसामध्ये असते. माणसाच्या स्वभावाविषयीच्या मार्क्सच्या या कल्पनेचाही मार्क्सवादी साहित्यसिद्धांताला संदर्भ आहे. (दिगंबर पाध्ये : १५ : २०१२) मार्क्सच्या सिद्धांतामध्ये अनुस्यूत असलेल्या या सुराचे सूतोवाच १९३० मध्ये लालजी पेंडसे यांच्या साहित्य आणि समाज (१९३०) या ग्रंथाच्या निमित्ताने मराठी समीक्षेच्या क्षेत्रात झाले. दिगंबर पाध्ये यांनी लालजी पेंडसे यांची ही मांडणी यांत्रिक व अनेक मर्यादा असलेली मानली असली, तरी मराठी समीक्षेच्या क्षेत्रात सामाजिक परिस्थिती व साहित्यनिर्मिती यामध्ये निश्चित संबंध असतो ही जाणीव दृढ करण्याचे श्रेय मात्र ते लालजी पेंडसे यांनाच देतात.

महाराष्ट्रातील संत मंडळाचे ऐतिहासिक कार्य (१९४८) या ग्रंथामध्ये बा. रं. सुंठणकर यांनी मध्ययुगीन समाज व साहित्य यांचे पाया व अतिरचना या सिद्धांताद्वारे विवेचन केले आहे. त्याचबरोबर गं. बा. सरदार यांनी संत साहित्याची सामाजिक फलश्रुती (१९५०) या ग्रंथामधून अप्रत्यक्षरीत्या पाया व अतिरचना याच सिद्धांताच्या आधारे संत साहित्याचे विश्लेषण केले आहे. त्यांच्या साहित्यिक आकलनावरही दिगंबर पाध्ये यांनी प्रकाश टाकला आहे. त्यांच्या या सबंध लेखनामध्ये मार्क्सवादी साहित्यसिद्धांत हा कलात्मकतेचे मूल्यमापन करणारा नाही, तर साहित्याचे समाजशास्त्र स्पष्ट करणारा सिद्धांत आहे, हीच धारणा अनुस्यूत आहे. त्यांनी आपल्या समीक्षालेखातून पु. य. देशपांडे यांच्या आत्यंतिक व्यक्तिवादी भूमिकेमुळे मराठी मार्क्सवादी साहित्य सिद्धांतामध्ये निर्माण झालेल्या गतिरोधाचे नेमके दर्शन घडवले आहे. मर्ढेकर कालखंडात मार्क्सवादापुढे खऱ्या अर्थाने कलावादाचे आव्हान निर्माण झाले व त्यातूनच मार्क्सवादी साहित्यसिद्धांताचे स्वरूप बदलू लागले. दि. के. बेडेकरांच्या निमित्ताने या काळात मार्क्सवादाचे एक प्रगल्भ रूप मराठी साहित्यसिद्धांतामध्ये स्थिर झाल्याचे दिसून येते. मराठी मार्क्सवादी साहित्यसिद्धांताची ही अनेकमार्गी; परंतु मर्यादित वाटचाल दिगंबर पाध्ये यांनी स्पष्ट केली आहे. त्यामध्ये या वाटचालीत या सिद्धांताला रूपवादाच्या आव्हानाचा करावा लागलेला सामना असेल किंवा कलावंताचे स्वातंत्र्य व कलेचे महत्त्व यादृष्टीने उपस्थित होणाऱ्या प्रश्नांमधून निर्माण होणारा गतिरोध हे सर्व दिगंबर पाध्ये यांच्या समीक्षा लेखनातून नैसर्गिकपणे आले आहे.

याच काळात मराठी साहित्यसमीक्षेमध्ये कधी लवचीक, कधी ताठर, तर कधी समन्वयवादी भूमिका घेऊन लालजी पेंडसे, बा. रं. सुंठणकर, गं. बा. सरदार, दि. के. बेडेकर, शरच्चंद्र मुक्तिबोध आदी समीक्षकांनी एका नव्या सिद्धांताची प्रतिष्ठापना करण्याचा प्रयत्न केला असला तरीही मराठी साहित्यसमीक्षेमध्ये मार्क्सवादी विचारसरणीचा म्हणावा तसा विकास झाला नाही कारण मार्क्सवादी म्हणजे केवळ वर्गसंघर्ष व क्रांतीच्या घोषणा नाही; त्यामागे माणूस व मानवी समाज या विषयीची एक तत्त्वज्ञानात्मक भूमिका आहे. मार्क्सवादी विचारधारा ही कष्टकऱ्यांच्या मुक्तीचा प्राधान्याने विचार करीत असली तरी मूलतः मानवमुक्तीचा विचार मांडणारी ती विचारधारा आहे ही बाब मराठी समाजाने फारशी विचारात घेतलेली दिसत नाही. (दिगंबर पाध्ये : २०१२ : १०) या ठिकाणी मराठी समीक्षकांना मार्क्सवादी विचारसरणीचे नेमके आकलन न होण्याची कारणे दिगंबर पाध्ये तत्कालीन वाङ्मयीन पर्यावरणावरील सौंदर्यवाद व कलावादाच्या अतिरेकामध्ये शोधण्याचा प्रयत्न करतात. इतर मराठी समीक्षकांनी मार्क्सवाद म्हणजे केवळ आर्थिक व राजकीय सिद्धांत नव्हे, तर ते एक अनेकविध ज्ञानशाखांशी संबंध असणारे संपूर्ण दर्शन आहे. या दृष्टिकोनातून मार्क्सवादाची एवढी व्यापक, विस्तारित व प्रगल्भ मांडणी दि. के. बेडेकर वगळता इतर कुणीही केली नसल्याचे दिगंबर पाध्ये यांनी अधोरेखित केले आहे. मराठी समीक्षेमध्ये मानवतावादी



अनुक्रमणिका



**“ दिगंबर पाध्ये यांच्या समीक्षा लेखनावरही दि. के. बेडेकर यांच्या लेखनाचाच प्रभाव दिसून येतो. त्यांची समीक्षा बेडेकरांच्या समीक्षेशी नाते सांगणारी आहे. त्यांना दि. के. बेडेकरांच्या लेखनामध्ये प्रगल्भ मार्क्सवादी विचारव्यूहाचे दर्शन घडल्याचे ते सांगतात. 'सौंदर्यावर निष्ठा आहे या अर्थाने मी सौंदर्यवादी आहे. सौंदर्याचा प्रत्यय मानवी जीवनाच्या संदर्भात येतो या अर्थाने मी जीवनवादी आहे. जीवनसापेक्ष समीक्षा ही सामाजिक, राजकीय व आर्थिक व्यवहाराशी संदर्भ ठेवते व एवढ्या अर्थाने मी जीवनवादी आहे.' (दि. के. बेडेकर : प्रस्तावना : १९६४) ही भूमिका दि. के. बेडेकरांच्या सबंध लेखनाच्या मुळाशी कार्यरत आहे. याच भूमिकेचा स्वीकार दिगंबर पाध्ये यांनी आपल्या लेखनामध्ये केला आहे. ”**

मार्क्सवादाचे जे सूतोवाच झाले त्याचे श्रेय दि. के. बेडेकर यांना जाते कारण ज्या काळात मराठीत एका बाजूला मोठ्या प्रमाणात मर्ढेकरी सौंदर्यशास्त्राचा, तर दुसऱ्या बाजूला विशुद्ध कलावादाचा प्रभाव मराठी समीक्षेवर होता; तसेच जीवनवादाचे समर्थन करून पोकळ अशा प्रचारी साहित्याचा पुरस्कार मोठ्या प्रमाणावर केला जात होता, अशा काळात बेडेकरांनी आपल्या लेखनाची स्वतंत्र वाट चोखाळली व मार्क्सवादी जीवनदृष्टी, कलेचे मोल व स्वायत्तता परखडपणे प्रतिपादित केली. (रणधीर शिंदे : २०१५ : ९२) रणधीर शिंदे यांच्या या विधानातून दि. के. बेडेकर यांच्या समीक्षा लेखनाचे नेमके वर्णन आले आहे. त्यातून बेडेकरांचे मराठी समीक्षा व्यवहारातील स्थानही निश्चित झाले आहे. मराठी समीक्षेला खऱ्या अर्थाने मानवतावादी मार्क्सवादाची ओळख करून देण्याचे श्रेय बेडेकरांनाच जाते व तो विचार पुढे घेऊन जाण्याचे श्रेय दिगंबर पाध्ये यांना द्यावे लागते.

दिगंबर पाध्ये यांच्या समीक्षा लेखनावरही दि. के. बेडेकर यांच्या लेखनाचाच प्रभाव दिसून येतो. त्यांची समीक्षा बेडेकरांच्या समीक्षेशी नाते सांगणारी आहे. त्यांना दि. के. बेडेकरांच्या लेखनामध्ये प्रगल्भ मार्क्सवादी विचारव्यूहाचे दर्शन घडल्याचे ते सांगतात. 'सौंदर्यावर निष्ठा आहे या अर्थाने मी सौंदर्यवादी आहे. सौंदर्याचा प्रत्यय मानवी जीवनाच्या संदर्भात येतो या अर्थाने मी जीवनवादी आहे. जीवनसापेक्ष समीक्षा ही सामाजिक, राजकीय व आर्थिक व्यवहाराशी संदर्भ ठेवते व एवढ्या अर्थाने मी जीवनवादी आहे.' (दि. के. बेडेकर : प्रस्तावना : १९६४) ही भूमिका दि. के. बेडेकरांच्या सबंध लेखनाच्या मुळाशी कार्यरत आहे. याच भूमिकेचा स्वीकार दिगंबर पाध्ये यांनी आपल्या लेखनामध्ये केला आहे. या अर्थाने दिगंबर पाध्ये हे केवळ समाजशास्त्रीय समीक्षक नव्हते, तर अनेक विद्याशाखीय संदर्भ त्यांच्या समीक्षालेखनाला लाभले होते. दिगंबर पाध्ये यांनी आपल्या लेखनामध्ये कोणत्याही साहित्यिकाच्या लेखनामागची मुख्य जाणीव ही साहित्यकृतीच्या विषयावरून किंवा साहित्यकृती मधील केवळ विधानावरून निश्चित करण्याची मराठी समीक्षेमधील पारंपरिक पद्धती टाळली आहे. या जाणीव निश्चितीसाठी पाध्ये यांनी लेखकाची ती साहित्यकृती ज्या सामाजिक व सांस्कृतिक परिस्थितीचे अपत्य आहे तिला केंद्रवर्ती ठेवले आहे. म्हणूनच कलावंताचे स्वातंत्र्य, कलेचे मानवी जीवनातील वैशिष्ट्यपूर्ण स्थान व तिला लाभलेले सामाजिक संदर्भ या सर्वच गोष्टींना त्यांच्या लेखनात मान्यता प्राप्त झाली आहे. दिगंबर पाध्ये यांना रूढ अर्थाने मार्क्सवादी समीक्षक म्हटले जाते; परंतु त्यांच्या संपूर्ण समीक्षा लेखनातून आढळणारे इतर आंतरविद्याशाखीय संदर्भ, त्यांनी मांडलेले साहित्याचे समाजशास्त्र व त्यांची कलास्वरूपशास्त्रविषयक भूमिका पाहिल्यास त्यांना केवळ मार्क्सवादी समीक्षक म्हणणे म्हणजे त्यांच्या साहित्यविषयक इतर आकलनाकडे दुर्लक्ष केल्यासारखेच होईल. कोणत्या तरी सिद्धांताच्या चौकटीत साहित्याला बसवून किंवा मानवी जीवनाच्या समकालीन व्यवस्थेचा एक भाग साहित्य कसे आहे हे दाखवून साहित्यांच्या कलात्मकतेविषयीचा वाचकाचा विवेक वाढण्याची व वाचकाच्या अभिरुचीवर काही एक संस्कार होण्याची शक्यता नसल्याचे पाध्ये यांनी सांगितले आहे. दिगंबर पाध्ये यांनी आपल्या समीक्षालेखनामध्ये कोणत्याही कलाकृतीचा विचार करताना आशय आणि रूप या दोन्ही गोष्टी वेगळ्या न करता त्याचा एकत्र विचार केला आहे. त्यांचा विचार एकास एक असा काटेकोरपणे न

करता या दोन्ही गोष्टी दोन नसून दुहेरी आहेत. त्या एकमेकीस पूरक असून त्यांचे परस्परपूरक असणेच संपूर्ण कला व्यवहारासाठी उपकारक असल्याचे त्यांनी मानले आहे. साहित्याच्या कलात्मकतेच्या आकलनासाठी रसिकाच्या जवळ असलेले कलाविषयक भान पुरेसे असले तरी कलाकृतीच्या मूल्यमापनासाठी तत्त्वज्ञान, समाजशास्त्र, मानसशास्त्र, इतिहासादी ज्ञानशाखांकडून मिळणारी मर्मदृष्टीही उपकारक ठरत असते. अशी धारणा त्यांच्या सबंध लेखनाच्या मुळाशी होती. हेच त्यांच्या लेखनाचे बलस्थान आहे.

दिगंबर पाध्ये यांनी मराठीतील बांधिलकीचा वाद या लेखामधून कलेसाठी कला की, जीवनासाठी कला हा वाद चर्चेस घेऊन बांधिलकीचा प्रश्न निकाली काढण्याचा प्रयत्न केला आहे. ते मराठी साहित्यातील बांधिलकीच्या वादाकडे पाहताना बांधिलकी ही केवळ वस्तुस्थिती अथवा नैतिक तत्त्व नसून ती एक वाङ्मयीन पद्धती असल्याचे मानतात. साहित्यिकाजवळ बांधिलकी असते म्हणजे ती बांधिलकी साहित्याशी नसून ती त्याच्या संस्काराशी व भूमिकेशी असते, त्याचा साहित्याशी प्रत्यक्ष संबंध नसतो. वाङ्मयीन प्रक्रियेचा एक अपरिहार्य भाग म्हणून साहित्यिकाचे संस्कार व भूमिका साहित्यातून येते किंवा येत नाही व तिलाच आपण बांधिलकी असणे किंवा नसणे असे म्हणतो; परंतु समकालीन समीक्षेमध्ये बांधिलकी म्हणजे ही सहज प्रक्रिया न राहता तो एक फॅशनेबल शब्द बनला आहे. या बांधिलकीच्या वादाबरोबरच पाध्ये यांनी 'साहित्यव्यवहार आणि बाजारपेठ', 'पुरोगामी साहित्याविषयी माझा आक्षेप', 'वाङ्मयेतिहासाविषयी थोडेसे' या आपल्या लेखांमधून साहित्यव्यवहारात निर्माण होणारे विविध प्रश्न व वादांची चर्चा व चिकित्सा केली आहे. या वादाविषयी बोलताना पाध्ये कुठेही खंडन-मंडनाच्या भूमिकेत जात नाहीत व सहमत असहमतही होत नाहीत. ते फक्त त्याची चिकित्सा करतात व अभ्यासाच्या अनेक दिशा चर्चेसाठी मोकळ्या करून निर्णय वाचकावर सोडतात; परंतु वाचकाला निर्णयापर्यंत पोहोचण्यासाठी आवश्यक पुरेसे संदर्भसाहित्य द्यायला ते विसरत नाहीत. यातूनच भाषाशास्त्र, काव्यशास्त्र, समाजशास्त्र, मानववंशशास्त्र, इतिहास, तत्त्वज्ञान, राज्यशास्त्र अशा अनेकविध ज्ञानशाखांचे संदर्भ त्यांच्या लेखनाला लाभले आहेत. हे त्यांच्या समीक्षेचे महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे.

दिगंबर पाध्ये यांचे समाज, संस्कृती, साहित्य, भाषा, समाजशास्त्र, साहित्यशास्त्र, कलास्वरूपशास्त्र, मार्क्सवाद आदी संकल्पनांचे सैद्धांतिक व्यूह पक्के होते. त्यांनी आपल्या लेखनातून समाजशास्त्रीय समीक्षा व मार्क्सवादी दर्शन यांची सैद्धांतिक चौकट निश्चित करण्याचा प्रयत्न केला आहे. ते केवळ समाजशास्त्र व साहित्यशास्त्र यांच्या अखत्यारीत येणाऱ्या संकल्पनांची सैद्धांतिक मांडणी करून थांबले नाहीत, तर त्या सैद्धांतिक व्यूहांच्या आधारे उपयोजित समीक्षा लेखनही केले आहे. समकालीन मराठी समीक्षेमध्ये बऱ्याच वेळा समाजशास्त्र, साहित्यशास्त्र, कलास्वरूपशास्त्र आदी शास्त्रातील सिद्धांतकल्पनांचे आकलन पक्के नसल्यामुळे एकाच समीक्षकाची सैद्धांतिक समीक्षा व उपयोजित समीक्षा यांच्यातील नातेही संशयास्पद असल्याचे दिसून येते. मराठी समीक्षेमध्ये सामान्यपणे आढळणारे असे अनेक दोष दिगंबर पाध्ये यांनी आपल्या लेखनामधून टाळले आहेत. समाजशास्त्र व कलास्वरूपशास्त्र यांना सांधणारे साहित्यशास्त्रीय आकलन त्यांच्या समीक्षेचे मुख्य अंतःसूत्र आहे.

दिगंबर पाध्ये यांनी आपल्या 'मराठी समीक्षा : काल आणि आज' या लेखामधून मध्ययुगीन साहित्यापासून ते आधुनिक साहित्यापर्यंतचा संपूर्ण पट मांडला आहे. त्यामध्ये त्यांनी मध्ययुगीन साहित्यनिर्मिती व आस्वादाची बलस्थाने व मर्यादा स्पष्ट करून या काळात मराठी समीक्षा विकसित न होण्यामागची नेमकी कारणपरंपरा शोधण्याचा प्रयत्न केला आहे. पुढे आधुनिक साहित्याच्या समीक्षेचे स्वरूप, चढउतार, ताणतणाव स्पष्ट करून विशिष्ट कालिक भेदावर त्या त्या साहित्याच्या व समीक्षेच्या यशापयशाचीदेखील चर्चा केली आहे. विवेकनिष्ठ निकषांचा पाठपुरावा करणारी, साहित्यातून व्यक्त होणाऱ्या अनुभवाचे स्वरूप नीट न्याहाळून, त्याचे विश्लेषण करून अर्थबोध करून देणारी, या जीवनानुभवांचा उगम आस्थेने शोधणारी व साहित्याच्या बऱ्या-वाईटाचा निर्णय करणारी अशी प्रत्यक्ष साहित्यकृतीची समीक्षा आज आवश्यक आहे. (दिगंबर पाध्ये :.२०१२ : ९०) या विधानातून दिगंबर पाध्ये यांनी मराठी साहित्यसंस्कृती सुदृढ होण्यासाठी साहित्य व

> "या वादविवादामध्ये दोन्ही बाजूंनी साहित्यिक मूल्यविवेकाची आवश्यकता असते; परंतु आपल्या मराठी साहित्य संस्कृतीमध्ये अनेकदा या मूल्यविवेकाला वितंडवादाचे स्वरूप प्राप्त होताना दिसते. त्यामुळे कलात्मक निर्मिती आणि प्रक्रियेमध्ये साक्षात जीवनानुभवाच्या आवश्यकतेचे तत्त्व व त्याचे सर्वांगीण परिणाम तपासण्यामध्ये आपली साहित्य संस्कृती कमी पडल्याचे निरीक्षण त्यांनी नोंदविले आहे. एकूण साहित्य, समाज व संस्कृती यांच्याबद्दलची व मराठी साहित्य संस्कृतीबद्दलची त्यांची विधाने / निरीक्षणे मराठी समीक्षेला पुढेच घेऊन जाणारी आहेत."

समीक्षा या दोन्ही बाजूंनी कोणते प्रयत्न व्हायला हवेत हे नेमकेपणाने सांगितले आहे. या ठिकाणी त्यांनी समीक्षेकडून जी अपेक्षा ठेवली आहे ती अपेक्षा त्यांची समीक्षा पूर्ण करते.

साहित्य आणि संस्कृती व आजची साहित्य संस्कृती या दोन लेखातून दिगंबर पाध्ये यांनी साहित्य आणि संस्कृती यांचा सहसंबंध उलगडून दाखविला आहे. हे दोन्ही घटक किती परस्परावलंबी आहेत हे नेमकेपणाने सांगितले आहे. त्याचबरोबर मराठी साहित्य संस्कृतीच्या विकासविस्तारातील विरोध-अवरोध व त्यासंबंधी काही नेमकी निरीक्षणे नोंदविली आहेत. साहित्य-संस्कृती-समाज यांच्यामध्ये अनेक संकल्पनांच्या बाबतीत परस्परविरोधी भूमिका दिसून येतात. यातूनच काही सांस्कृतिक व साहित्यिक वादविवाद निर्माण झाले आहेत. खरे तर या वादविवादातूनच साहित्य विषयक अभिरुचीचे अभिसरण होऊन साहित्य संस्कृती एकात्म होण्याची प्रक्रिया गतिमान व्हायला हवी; परंतु मराठी समीक्षेमध्ये असे वाद अपवादानेच पाहायला मिळतात.

या वादविवादामध्ये दोन्ही बाजूंनी साहित्यिक मूल्यविवेकाची आवश्यकता असते; परंतु आपल्या मराठी साहित्य संस्कृतीमध्ये अनेकदा या मूल्यविवेकाला वितंडवादाचे स्वरूप प्राप्त होताना दिसते. त्यामुळे कलात्मक निर्मिती आणि प्रक्रियेमध्ये साक्षात जीवनानुभवाच्या आवश्यकतेचे तत्त्व व त्याचे सर्वांगीण परिणाम तपासण्यामध्ये आपली साहित्य संस्कृती कमी पडल्याचे निरीक्षण त्यांनी नोंदविले आहे. एकूण साहित्य, समाज व संस्कृती यांच्याबद्दलची व मराठी साहित्य संस्कृतीबद्दलची त्यांची विधाने / निरीक्षणे मराठी समीक्षेला पुढेच घेऊन जाणारी आहेत. निकोप वादविवादात देवाणघेवाण असते. त्यामुळेच साहित्यातील अशा वादविवादातून साहित्य विषयक अभिरुची संस्कारित होऊ शकते. त्यांनी आधुनिक मराठी साहित्याच्या उदयापासून नवसाहित्याच्या निर्मितीपर्यंत साहित्यविषयक जाण व अभिरुची विकसित होण्याची व प्रवाही राहण्याची कारणपरंपरा या वादविवादामध्येच शोधण्याचा प्रयत्न केला.

परंतु दुर्दैवाने आजच्या मराठी साहित्य संस्कृतीतील वादविवादाचे स्वरूप असे देवाणघेवाणीचे राहिलेले नाही. उलट त्यामध्ये एकप्रकारचा एकांगीपणाच दिसतो. दि. के. बेडेकर म्हणतात त्याप्रमाणे सौंदर्यवाद व कलेसाठी कला असे मानणाऱ्या लोकांकडून कलात्मक स्वातंत्र्याला धोका आहे असे समाजवादी, मार्क्सवादी, पावित्र्यरक्षक, नीतिमार्तंड इत्यादी लोकांनी म्हणावे, तर याउलट कलेला प्रचारासाठी राबविणाऱ्या उपयुक्ततावाद्यांकडून व बोधवाद्यांकडून कलेच्या स्वातंत्र्याला खरा धोका आहे, असे सौंदर्यवाद्यांनी म्हणावे. मराठी समीक्षेच्या क्षेत्रात असाच प्रकार आज चालू आहे. (दि. के. बेडेकर : १९५४ : २८). एकेकाळी अवडंबर निर्माण केलेल्या या वादाने मराठी साहित्य संस्कृतीच्या विकासात अनेक अडथळे निर्माण केले आहेत. हे कमी की काय म्हणून अलीकडच्या काळात दलित, उच्चवर्णीय, ग्रामीण, नागर, आदिवासी अशा अनेक गटांनी स्वतःच्या मर्यादा आखून घेतल्या. त्यामुळे निकोप संघर्षातून एकात्मतेची प्रक्रिया सुरू होण्याऐवजी विघटनात्मक प्रक्रियाच जास्त वळावत चालली आहे. ही अवस्था कोणत्याही सांस्कृतिक घटनेला घातकच ठरणारी आहे. मराठी समीक्षा व्यवहारही दुर्दैवाने अशाच दुष्टचक्रात अडकला आहे, त्याची यातून सुटका होणे महत्त्वाचे आहे.

दिगंबर पाध्ये यांनी आपल्या वाङ्मयेतिहासाविषयी थोडेसे व आधुनिक मराठी वाङ्मयेतिहासाचे अध्यापन या

लेखांमधून आपली वाङ्मयेतिहासलेखनाची परंपरा समजून सांगितली आहे. ते स्वदेश, स्वभाषा, याविषयीचा अभिमान व प्रेम यांच्या गरजेमध्ये आपल्या वाङ्मयेतिहासलेखनाची बीजे शोधताना दिसतात. पारतंत्र्याच्या काळात पाश्चात्त्य साहित्य संस्कृतीपेक्षा आपली साहित्य संस्कृती वेगळी कशी आहे हे सांगण्याच्या उद्देशातून ही गरज अधिक प्रबळ झाली होती. ती आताच्या काळात तेवढी प्रबळ राहिली नाही. किंबहुना राहिलेलीच नाही. आज आपल्या मराठीपणाची व भारतीयत्वाची ओळख स्पष्ट करणे व आज निर्माण होत असलेल्या साहित्याचा आपल्या परंपरेशी संबंध जोडणे या आपल्या सामाजिक- सांस्कृतिक गरजा आहेत. या गरजांमधून जेव्हा इतिहास लिहिले जातात तेव्हाच ते समाजाचे खरे कुतूहल पूर्ण करणारे इतिहास ठरतील अशी दिगंबर पाध्ये यांची पक्की धारणा होती. याठिकाणी दिगंबर पाध्ये वाङ्मयेतिहासाच्या लेखनाकडे गरजेकडे एक सामाजिक सांस्कृतिक गरज या दृष्टीने पाहतात.

दिगंबर पाध्ये यांची इतिहासाविषयी स्वतंत्र दृष्टी होती. तिच्यावर हेगेलाच्या इतिहास मीमांसेचे संस्कार झाले होते. ते इतिहासाचा वर्तमान परिस्थितीच्या संदर्भात अर्थ लावू पाहत होते. याच परिप्रेक्ष्यातून ते वाङ्मयेतिहासाकडेही पाहतात. आपले आधुनिक साहित्य पाश्चात्त्यांच्या संस्काराने निर्माण झाले असले तरी ते पाश्चात्त्य होऊ शकत नाही. इतर भारतीय भाषांशी या साहित्याचे असणारे नाते दृढ असणेच स्वाभाविक आहे. अशा वेळी कन्नड, हिंदी, गुजराती, बंगाली साहित्यांशी मराठी साहित्याचे नाते काय? किती? असे प्रश्न समोर ठेवून वाङ्मयेतिहास सिद्ध होऊ शकला, तर ते आजच्या काळात प्रस्तुत ठरेल. वर्तमान काळातील एका सामाजिक गरजेची पूर्तता त्याद्वारे होऊ शकेल. (दिगंबर पाध्ये : २०१२ : २७६) याठिकाणी दिगंबर पाध्ये वाङ्मयेतिहास व एकूणच इतिहासाकडे व्यापक दृष्टिकोनातून पाहताना दिसतात. ते इतिहासाला केवळ भूतकाळातील घटनांची संगतवार जुळणी मानत नाहीत, तर ते इतिहासाला वर्तमान समजून घ्यायचे साधन मानतात. इतिहासलेखन म्हणजे भूतकाळातील घटनांचा अर्थ लावण्याचा प्रयत्न असतो. म्हणूनच इतिहास वेगवेगळ्या दृष्टिकोनातून वारंवार लिहिला जाऊ शकतो. या न्यायाने एकाच कालखंडाचे अनेक वेगवेगळे इतिहास संभवतात. वर्तमान व्यवहारात गुंतलेल्या अनेकांना भूतकाळ समजून तरी कशासाठी घ्यायचा? या सारखे प्रश्न पडू शकतात; परंतु आपला भूतकाळ म्हणजेच इतिहास हा असा मृत नसतो. तो आपल्या कळत नकळत आपल्या वर्तमानात मिसळलेला असतो. हीच धारणा दिगंबर पाध्ये यांच्या इतिहासमीमांसेच्या मुळाशी आहे.

दिगंबर पाध्ये कलावंताच्या व्यक्तिमत्त्वाकडे पाहताना त्याचा सुटा व स्वतंत्र विचार करत नाहीत. ते त्यांचे स्वतंत्र व्यक्तिमत्त्व नाकारतात आणि त्याचे अस्तित्व इतर व्यक्तींच्या व भवतालाच्या संदर्भात तपासतात. त्यामुळे त्यांच्या समीक्षेमध्ये आपोआपच सामाजिकतेला अधिक महत्त्व प्राप्त झाले आहे. कलेची सापेक्ष स्वायत्तता मान्य करून कलावंताच्या व्यक्तित्वाचे सामाजिकतेच्या परिप्रेक्ष्यातून मूल्यमापन करणारी बेडेकरांची भूमिका दिगंबर पाध्ये यांना जवळची वाटते. दिगंबर पाध्ये हे साहित्यकृतीच्या केवळ रूप तंत्राला महत्त्व देत नाहीत, तर ते साहित्यकृतीच्या आशयालाही तितकेच किंबहुना जास्त महत्त्व देतात. त्यामुळेच त्यांना साहित्यकृतीच्या मूल्यमापनासाठी दुहेरी कसोटीचा अवलंब करणारी बेडेकरांची प्रकृती अधिक जवळची वाटते. बेडेकर ज्या काळात लिहित होते त्या काळात सौंदर्य, रूप, आशय हे शब्द बऱ्यापैकी सर्वपरिचित होते. सौंदर्य या शब्दाला एक निश्चित स्वरूपाचा संकल्पनात्मक अर्थ मर्ढेकरांच्या लेखनाने रूढ झाला होता; परंतु आशयाबद्दल मात्र संपूर्ण वाङ्मयव्यवहारामध्ये संदिग्धताच होती. या पार्श्वभूमीवर ललित साहित्यकृती म्हणजे कलावंताने आपल्या अनुभवाच्या आधारे रचलेल्या व्यूहाद्वारे व्यक्त केलेले जीवनविषयक आकलन असते. (दिगंबर पाध्ये : २०१२ : १२७) ही बेडेकरांची भूमिका दिगंबर पाध्ये यांना साहित्याचा आशय म्हणजे काय? या मराठी साहित्य समीक्षेतील संदिग्ध व अनुत्तरीत प्रश्नाचे अधिक स्पष्टीकरण देणारी आहे. पुढे मराठी समीक्षेतील समाजशास्त्रीय भूमिकेचा जो विकास झाला त्यामध्ये बेडेकरांच्या या भूमिकेला अधिक महत्त्व आहे. म्हणूनच दि. के. बेडेकरांची समीक्षा दिगंबर पाध्ये यांना अधिक प्रगल्भ वाटते. आत्यंतिक आकृतिवाद व टोकाची शेरेबाजी यामध्ये अडकलेल्या मराठी समीक्षेला चिंतनशीलतेकडे घेऊन जाण्याचे कार्य दि. के. बेडेकर यांनी केले आहे. त्यांच्याच

कार्याचा एक भाग किंवा एक सूत्र म्हणजे दिगंबर पाध्ये यांचे लेखन होय, कारण स्वायत्तता आणि मुक्त स्वातंत्र्य या मध्ये दि. के. बेडेकरांच्या प्रमाणेच दिगंबर पाध्येही भेद करतात. ते स्वायत्ततेला मुक्त स्वातंत्र्याकडे जाऊ देतं नाहीत. सापेक्ष स्वायत्तता त्यांना महत्त्वाची वाटते. कलेच्या सापेक्ष स्वायत्ततेचा मुद्दा मराठी समीक्षेमध्ये स्पष्टपणे मांडण्याचे श्रेय दि. के. बेडेकरांना जात असले तरी बेडेकरांनी सुरू केलेली ही परंपरा पुढे घेऊन जाण्याचे श्रेय मात्र दिगंबर पाध्ये यांना जाते.

थोडक्यात, मराठी साहित्य समीक्षा एकीकडे पाश्चात्त्य साहित्य सिद्धांताच्या अनुवादामध्ये गुंतलेली असताना तिला निर्मळ व व्यवहारी समाजशास्त्रीय ज्ञानपरंपरेतील संस्कार घेऊन व्यक्त होण्याची सवय ज्या पिढीने लावली त्या पिढीच्या मोजक्या शिलेदारांमध्ये दि. के. बेडेकरांच्या बरोबर दिगंबर पाध्ये यांचेही नाव अग्रक्रमाने घ्यावे लागते. त्यांनी नैमित्तिक स्वरूपात वेळोवेळी केलेल्या लेखनातही एक प्रकारची सुसंगती जाणवते. त्यातून एक विचारसरणी व्यक्त होते. केवळ साहित्याची सरधोपट समीक्षा करणे हे त्यांच्या लेखनाचे मूळ प्रयोजन नव्हते. त्यांच्या लेखनाचा तो स्वभावही नव्हता. साहित्य व त्यांची चर्चा या दोहोंची भूमी असलेला समाज आणि समाजाच्या ऐतिहासिक-भौतिक धारणा व यातून आकारास येणारे समाजशास्त्र या साऱ्याची चिकित्सा त्यांच्या लिखाणात ओघाने येताना दिसते. त्यातून जी सैद्धांतिक भूमिका व्यक्त होते ती मराठी साहित्याच्या समाजशास्त्राची मांडणी करणारी आहे. तिने मराठी समीक्षेला कलास्वरूपशास्त्र व सौंदर्यशास्त्राकडे समाजशास्त्रीय परिप्रेक्ष्यातून पाहायला शिकविले. साहित्यकृतीचे प्रयोजन व परिणाम यामध्ये गुंतलेल्या मराठी समीक्षेला दि. के. बेडेकर यांच्या नंतर दिगंबर पाध्ये यांनी समाजशास्त्रीय विश्लेषणाची जोड दिली. कोणत्याही साहित्यकृतीवर सावधपणे भाष्य करणे हे त्यांच्या समीक्षेचे बलस्थान आहे. त्यांची समीक्षा विधानात्मक पातळीवर न राहता ती ससंदर्भ व्यक्त होते.

**संदर्भ :**


- दिगंबर पाध्ये : नारायण सुर्वे यांची कविता, लोकवाङ्मय गृह, मुंबई, १९८२.
- दिगंबर पाध्ये : साहित्य, समाज आणि संस्कृती, लोकवाङ्मय गृह मुंबई, १९९८
- दिगंबर पाध्ये : अवलोकन - मराठी समीक्षा आणि साहित्य, लोकवाङ्मय गृह, मुंबई, २०१२
- दि. के. बेडेकर : साहित्य- विचार, लोकवाङ्मय गृह, मुंबई, १९६४
- दि. के. बेडेकर : साहित्य निर्मिती व समीक्षा, लोकवाङ्मय गृह, मुंबई, १९५४.
- रणधीर शिंदे : ज्वालेचे फूल : शरच्चंद्र मुक्तिबोध : व्यक्ती आणि वाङ्मय, लोकवाङ्मय गृह मुंबई, २०१२.
- रणधीर शिंदे : दिनकर केशव बेडेकर, साहित्य अकादमी नवी दिल्ली, २०१५.


●


**नामदेव गपाटे**
बनारस हिंदू युनिव्हर्सिटी वाराणसी
चलभाष : ९६४८८८२००६
इ-मेल : namanirala@gmail.com


**भावपूर्ण श्रद्धांजली!**



**अशोकराव दवंडे** यांचे निधन २४ डिसेंबर २०१८रोजी झाले. ते मसाप शाखा इचलकरंजीचे कार्याध्यक्ष म्हणून कार्यरत होते. गेली सलग २२ अ.भा. मराठी साहित्य संमेलनात न चुकता रसिक मित्रांसह उपस्थित राहत. म.सा.प. तर्फे त्यांना भावपूर्ण श्रद्धांजली!

**भावपूर्ण श्रद्धांजली!**



गदिमांचे सुपुत्र आणि प्रसिद्ध लेखक **श्रीधर माडगूळकर** यांचे २१ फेब्रुवारी २०१९ रोजी दुःखद निधन झाले. गदिमांच्या स्मृतींचा जागर गदिमा प्रतिष्ठानच्या माध्यमातून करताना त्यांनी गदिमांच्या स्मारकासाठी सातत्याने पाठपुरावा केला. म.सा.प. तर्फे त्यांना भावपूर्ण श्रद्धांजली!



लेख

# प्रयोगरूप लोककला : गोंधळ

आप्पासाहेब पाटील

लोकसाहित्याच्या प्रयोगरूप लोककलेतील लोकप्रिय लोककला प्रकार म्हणजे 'गोंधळ' होय. धार्मिक आणि सांस्कृतिकदृष्ट्या गोंधळाला मराठी लोकजीवनात महत्त्वपूर्ण स्थान आहे. घराण्याचा कुलाचार म्हणून व देवीचा उपासनेचा एक भाग म्हणून महाराष्ट्रातील काही कुटुंबांत आजही गोंधळ घातला जातो. महाराष्ट्रात देवीच्या उपासनेतील 'गोंधळ' हा विधी करणाऱ्या आराधी, भुत्ये, भोपे, डवरी यांसारख्या संस्था अनेक शतकापासून अस्तित्वात आहेत. घरात मंगल कार्य झाल्यावर डाक घालणे किंवा जागरणाचा कार्यक्रम करणे हे विधी केले नाही, तर अरिष्ट येते, अशी आजही समजूत आहे. यावरून देवतेस प्रसन्न करणे आणि त्यांची उपासना करून शांती करणे ही उद्दिष्टे या विधीमागे आहेत असे स्पष्ट होते. गोंधळ हा विधी आपले स्वत:चे वेगळेपण जपून लोकधर्माशी आपले नाते टिकवून आहे. त्यातून गोंधळाच्या नृत्य, नाट्य, संगीत आणि गीत या कलाविष्कारातून लोकसंस्कृतीला विशेष पैलू लाभले आहेत.

महाराष्ट्रात देवीच्या उपासनेत रूढ असलेल्या गोंधळ या विधिनाट्याचे मूळ कशात आहे, हे निश्चित सांगणे अवघड आहे. असे असले तरी देवतेची स्तुती करण्याचा विधी फार प्राचीन आहे. गोंधळाच्या परंपरेबरोबर त्यांच्या मुळापर्यंत जाणे दिशादर्शक ठरते. देवतांची परंपरा जितकी प्राचीन, तितकीच गोंधळ्यांची परंपरा प्राचीन आहे असे म्हणता येते.

'गोंधळ' या शब्दाशी 'गणदल' शब्द साम्य दाखवतो. 'गणदल' म्हणजे 'भक्तगण' असा अर्थ सूचित होतो. भक्तांचा संच असाही अर्थ अभिप्रेत असावा. यावरून भक्तगणाने मांडलेली पूजाविधी, केलेली स्तुती होय. गोंधळ हा शब्द गडबड या अर्थी वापरला जातो. यावरूनच गोंधळ घालणे म्हणजे गडबड, हलकल्लोळ करणे असा अर्थ रूढ झाला आहे, असे मत डॉ. प्रभाकर मांडे यांनी आपल्या 'लोकरंगभूमी' या पुस्तकात व्यक्त केले आहे. गणदलावर प्रकाश टाकणारी कथा पुढीलप्रमाणे-

एकदा शंकराच्या अकरा रुद्रगणांनी बनारसच्या मनकर्णिका घाटावर घोर तपश्चर्या करून शंकरास प्रसन्न करून घेतले. तेव्हा प्रसन्न झालेल्या शंकराने या रुद्रगणांस आपली आठवण म्हणून काही अलंकार व शस्त्रे दिली. त्यात डमरू, त्रिशूल, रुद्राक्षमाला आणि भस्म यांचा समावेश होता. शंकराचे हे भक्तगण 'रुद्र' किंवा 'गण' म्हणून ओळखले जातात. त्यावरून गणदल म्हणजे भक्तगण समुदाय असा अर्थ सूचित होऊन या गणदलाने केलेला पूजेचा उपचार म्हणजेच 'गणदल' अशी उत्पत्ती 'गोंधळ' या शब्दाशी लावता येते.

गणदल - गंदल - गोंदळ - गोंधळ या शब्दाचा विकासक्रम असा सांगता येईल. याशिवाय गणदलातील 'गण' गोंधळातही पाहावयास मिळतो. लोकधर्मी नाट्यात 'गण' नाट्याची परंपरा खूप प्राचीन आहे. गोंधळातही पूर्वरंगात 'गण' असतो. त्यात देवीचे स्तवन, वंदन येते. आपली उत्पत्ती जमदग्नी आणि रेणुका यांच्यापासून झाली, अशी धारणा गोंधळात आढळते. रेणुका महात्म्यातील या संदर्भातील कथा अशी -

परशुरामाने बेटासुर नावाच्या दैत्याचा वध केल्यानंतर त्याचे शिर तोडले. त्या शिराच्या ब्रह्मरंध्रात त्याच्याच शिरातील तंतू ओवले आणि ते शिर घेवून 'तिंतृण तिंतृण' असा आवाज काढीत मातेजवळ आला. बेटासुराच्या शिराचे बनवलेले चौंडके वाजवून परशुरामाने केलेले पहिले मातृवंदन म्हणजेच गोंधळाच्या परंपरेचा उदय होय. यावरून मातृवंदनाची, वंदन करण्याची प्रथा पुढे गोंधळाच्या रूपाने रूढ झाली असावी असे म्हणता येते. पुराणातून भूत मातृमहोत्सवाचे काही उल्लेख येतात. इच्छित साध्य करण्यासाठी, दु:ख, पीडा, संकटे टाळण्यासाठी भूतमातेचा उत्सव साजरा केला जात असल्याचे हे उल्लेख आहेत. या दृष्टीने मागोवा घेताना इ. स. १००० पूर्वीच्या काळापर्यंत जाता येते. रेणुका माता तर त्याही पूर्वीची. त्यावरून देवीच्या उपासकांची प्राचीनता लक्षात येते. यादवकालीन मराठी वाङ्मयाच्या आधारे 'गोंधळ' आणि 'गोंधळी' यांच्या प्रथेवर प्रकाश पडतो. यादवकालीन मराठी वाङ्मयातील काही उल्लेख खालीलप्रमाणे- ज्ञानेश्वरीत भूत-पिशाच्च या अर्थाने आलेला 'गोंदळी' उल्लेख. दासोपंताच्या गीतार्णवातील

भूतांचा गोंधळी पडिले। ते माणूस नव्हे आपुले.



> **"गोंधळ हे विधिनाट्य गोंधळी जातीचे लोकच सादर करू शकतात. या जातीचे लोक महाराष्ट्र, कर्नाटक, मध्यप्रदेश या प्रांतात आढळतात; पण विशेष करून महाराष्ट्रात जास्त प्रमाणात आढळतात. गोंधळ हा आता केवळ विधी राहिला नसून विधिस्वरूपाचा एक नाट्यप्रकार झाला आहे. हा नाट्यप्रकार विकसित करण्याचे आणि त्या माध्यमातून महाराष्ट्रात देवीसंबंधीची श्रद्धा जागृत ठेवण्याचे महत्त्वपूर्ण कार्य गोंधळ्यांनी केले आहे."**

नामदेवाच्या रूपकात्मक अभंगातही

"ऐसी बहुलोका माझारी। आई खेळ तसे गोंधळी वो"

अशा प्रकारचे उल्लेख आढळतात.

आतापर्यंतच्या विवेचनावरून असे स्पष्ट होईल की, गोंधळ हा दक्षिण भारतातील अतिप्राचीन असा देशी नृत्यप्रकार असून लोकदेवतांचे त्याप्रमाणे त्यांच्या भगतांचे उन्नयन होत गेले आणि मुळातल्या वेड्यावाकड्या उन्मादी, बीभत्स नृत्यप्रकारची जागा पद्धतशीर आकृतिबंध असलेल्या लोकविधीने घेतली आणि त्यासंबंधीच्या विधिनाट्यात त्याचे रूपांतर झाले. असे असले तरी लोकमानसात गोंधळ या शब्दाचा लौकिक अर्थात गडबड, वेडेवाकडे वागणे हा अर्थ रूढच राहिला. प्राचीन काळात होणाऱ्या भूतमातृमहोत्सवात होणाऱ्या गौडली नृत्यात गोंधळ या विधिनाट्याचा उगम असल्याचे प्रभाकर मांडे यांनी त्यांच्या 'लोकरंगभूमी' या पुस्तकात साधार स्पष्ट केले आहे. महाराष्ट्रातील गोंधळ्यांच्या प्रत्येक पिढीत विधिनाट्याच्या स्वरूपाला विकसित करून त्याचा एक निश्चित असा आकृतिबंध सिद्ध केला आहे गोंधळाची स्वतंत्र रंगभूमी विकसित केली आहे.

गोंधळ हे विधिनाट्य गोंधळी जातीचे लोकच सादर करू शकतात. या जातीचे लोक महाराष्ट्र, कर्नाटक, मध्यप्रदेश या प्रांतात आढळतात; पण विशेष करून महाराष्ट्रात जास्त प्रमाणात आढळतात. गोंधळ हा आता केवळ विधी राहिला नसून विधिस्वरूपाचा एक नाट्यप्रकार झाला आहे. हा नाट्यप्रकार विकसित करण्याचे आणि त्या माध्यमातून महाराष्ट्रात देवीसंबंधीची श्रद्धा जागृत ठेवण्याचे महत्त्वपूर्ण कार्य गोंधळ्यांनी केले आहे. महाराष्ट्रात प्रामुख्याने गोंधळ्यांच्या रेणुराई व कदमराई अशा दोन पोट जाती असल्याचे सांगितले जाते. या उपजातींना 'थोकटं घर' आणि 'धाकटं घर' असे म्हणतात. यामध्ये रेणुराई गोंधळ्यांचा उद्धार परशुरामाने केला व कदमराई गोंधळी यांचा प्रभू रामचंद्राने केला असे सांगतात. गोंधळ्याचा गोंधळी होण्याचा एक विधी वैशिष्ट्यपूर्ण असतो. तेव्हाच त्यांना 'गोंधळ' हा विधी घालण्याची परवानगी मिळते किंवा तेव्हा ते पात्र होतात. गोंधळ या विधिनाट्यात गोंधळी स्त्रियांचा सहभाग कधीही नसतो.

महाराष्ट्रात प्रचलित असणाऱ्या गोंधळ विधीत गोंधळ्यांची संख्या चार ते आठ अशी असते. त्यातील एक प्रमुख असतो. बाकी त्यांचे साथीदार असतात. या साथीदारांत वाद्य वाजवणारे वादक त्याचप्रमाणे समूहगानात किंवा समूहगानवर्तनात सहभागी होणारे इतर असतात. त्यापैकी काही सूर ओढून गाण्यात रंग भरणारे सुरते असतात. मुख्य गोंधळ्यांच्या मागे तुणतुणे वाजवणारे सहकारी आणि सुरते यांची एक चार-सहा जणांची मानवी भिंत निर्माण होते. प्रमुख गोंधळी आणि संबळ वाजवणारा सहकारी असे आणि नाट्याच्या सादरीकरणात प्रसंगाविशेषी एखादा मागे उभ्या असलेल्या सहकाऱ्यांपैकी असे मिळून गोंधळ नाट्याचे सादरीकरण करतात. त्यातील व्यक्तींच्या संख्येचे बंधन नसते. आज रूढ असलेल्या गोंधळाच्या प्रकारांत काकड्या गोंधळ व संबळ्या गोंधळ असे दोन प्रकार आढळतात. काकड्या गोंधळ हे कोणत्याही जातीचे लोक करू शकतात. काकड्या म्हणजे पेटलेले भंदे देवी भोंवती ओवाळण्याच्या क्रियेला 'भंदे खेळणी' असे म्हणतात. औरंगाबाद जिल्ह्यातील सावरखेड या गावी हा विधी प्रकार आढळून येतो. तर संबळ्या गोंधळ हा गोंधळी जातीचे लोकच घालतात.

गोंधळाच्या विधीवेळी विशेष पोषाख परिधान करण्याचा रिवाज आहे. रेणुराई गोंधळी कंगणीदार पगडी घालतात. प्रमुख गोंधळी पायघोळ झगा घालतो. या झग्याचा नाचताना झालेला फुगवटा बहारदार दिसतो. वेळोवेळी झग्याचा आख्यानातील स्त्री भूमिका किंवा बाळ जोजवण्याच्या प्रसंगासाठी हमखास उत्कृष्ट उपयोग होतो. त्यांच्या गळ्यात चौसष्ट कवड्यांची माळ असते. प्रत्येक कवडीनंतर रेशमी गोंडा असतो. कदमराईच्या कवडीला गोंडा नसतो. ते कंगणीदार पगडी घालीत नाहीत. त्याऐवजी कवड्याची उंच टोपी घालतात. पायघोळ झगा दोहोतही सारखाच असतो; पण सध्या विधी करणाऱ्याचाही दृष्टिकोन भक्तांइतकाच औपचारिक झाल्यामुळे पोशाखाचा रिवाज सर्वत्र पाळला जात नाही.

गोंधळ या विधिनाट्याची ही रंगभूमी गोंधळ्यांनी सिद्ध केली आहे. तेथे सर्वांत आधी देवतेचे अधिष्ठान निर्माण केले









अनुक्रमणिका

जाते. देवतेचे अधिष्ठान निर्माण करण्यासाठी आधी भूमीवर एका बाजूला घटस्थापना करतात. उसाची किंवा ज्वारीची पाच ताटे अशा रीतीने बांधतात की, ज्यांचे वरचे भागात एक चौकोन तयार व्हावा. उसाच्या तिकाटणीत तांबडे मदऱ्याचे कापड अंथरून त्यावर धान्याने 'गादी भरतात'. मध्ये लहानशी धान्याची रास मांडून त्यावर पाण्याने भरलेला तांब्या आणि त्यात पाच किंवा सात नागवेलीची पाने उलटी ठेवून त्यावर नारळ ठेवतात. धान्याच्या गादीवर घट ठेवतात. घटस्थापना करून समोर देवीचा 'टाक' मांडतात. समोर पाच विड्याची पाने मांडून त्यावर खारीक, खोबरे, सुपारी व पैसा ठेवून धूप, दीप, उदबत्ती लावतात. ज्याच्या घरी गोंधळाचा विधी होत असतो, त्या यजमानाकडून देवीच्या घटाची व टाकाची यथासांग पूजा करण्यात येते. घटावर उसाच्या तिकाटणीला फुलोरा त्यात करंज्या, साटोऱ्या, पुऱ्या इत्यादी पदार्थ लावलेले असतात आणि फुलांच्या माळा सोडतात. रंगभूमीवर देवतेची प्रतिष्ठापना झाल्यानंतर गोंधळाचे विशिष्ट वाद्य 'संबळ' तुणतुण्याच्या साथीने वाजवून वातावरणनिर्मिती केली जाते. तिन्ही बाजूंनी सर्व वयांचे, सर्व जातीचे प्रेक्षक असतात. त्यांच्या समोर त्यांची जाणीव ठेवून विधिनाट्याच्या सादरीकरणास प्रारंभ होतो. अलीकडच्या काळात इतर इलेक्ट्रॉनिक वाद्यांचाही समावेश केला जातो. गोंधळ हा पूर्वरंग व उत्तररंग अशा दोन भागांत विभागलेला विधी आहे. प्रथम पूर्वरंगात इतर शुभकार्यात जसे श्रीगणेश वंदन केले जाते तसेच गोंधळातही प्रथम गण गाऊन म्हणजेच गणेशाला वंदन करून केले जाते. त्याचबरोबर श्रीकृष्णाच्या बाललीलांचे गायन होते. म्हणजेच गवळण गायली जाते. ह्या सर्व गोष्टी करत असताना त्यामध्ये नृत्य, नाट्य, गीत व संगीत इत्यादी गोष्टी अंतर्भूत असतात. याचाच अर्थ असा की, गोंधळाच्या पूर्वरंगात गणगवळण असते.

गोंधळाच्या उत्तररंगात संगीत नृत्य, नाट्य, कथागीत, संवाद, विनोद यांचा संयोग असतो. यात पौराणिक किंवा लौकिक आख्याने असतात. कधी कधी सामाजिक विषयावर आधारित कथात्मकगीत सादर केले जाते. उत्तररंग असा नाट्यमय असतो. त्यामुळेच या एकूण विधीला विधिनाट्य असे म्हटले जाते. आख्याने सादर करत असताना भोवतालच्या वास्तवाचे संदर्भ येतात. सामाजिक, धार्मिक किंवा राजकीय स्थिति-गतीवर त्यात टीकाटिप्पणी केली जाते. उत्तररंगाचे स्वरूप लवचीक असते. आख्यानाच्या वेळी सादरीकरणाच्या वेळी गोंधळी कलावंत स्वातंत्र्य घेतात. म्हणजे प्रेक्षकांचा आळस, झोप उडविण्यासाठी इतर विनोदी प्रसंग सादर केले जातात किंवा संबंध नसलेली कवने अधूनमधून गायली जातात. यामुळे इतर कलावंतांना थोडी विश्रांती मिळते. आख्यान सादर करतेवेळी प्रसंगानुसार मेक्‌बिल्वीचे तंत्र वापरतात. म्हणजेच प्रेक्षकांसमोर शब्दाद्वारे आभासी चित्र उभा करतात. उदा. तो पाहा ठक्कसेन राजाचा वाडा. अरेरेऽऽअरेरेऽऽ केवढं मोठं पिंपळाचं झाड, राक्षस इत्यादी गोष्टींचा प्रत्यय शब्दचमत्कृतीतून देतात.

उत्तररंगात पात्रपरत्वे कधी-कधी वेशभूषाही केली जाते. आहार्य, वाचिक, आंगिक आणि सात्त्विक या चारही प्रकारच्या अभिनयाच्या संयोगातून प्रसंगनाट्य उभे राहते. गोंधळाच्या विधिनाट्याची पकड आजही समाजावर कमालीची आहे. रंजकता किंवा क्रीडात्मकता हे लोकधार्मिक संस्थांचे वैशिष्ट्य गोंधळात उत्कटपणे जाणवते. या रंजकतेच्या वैशिष्ट्यामुळे उद्‌बोधन सहज सुलभ होते. संतांनी आपल्या व्यापक विचारांच्या व्यापक प्रचारासाठी 'गोंधळ' हे माध्यम म्हणून वापरले आहे. त्यात भारूड वाङ्मयाचे सम्राट एकनाथ यांनी भारुडात गोंधळाचा बेमालूमपणे वापर केला आहे हे सर्वश्रुत आहे. मराठीत पोवाडे हा वाङ्मयप्रकार गोंधळ यांच्या कथात्मक रचनेतून निर्माण झाला आहे. तसेच ध्रुवपद म्हणण्याची पद्धती, कथागायनाची सरणी आणि पुन्हा रचनेत बदल करून मूळ ध्रुवपदाला जोडून एक घटना पूर्ण झाल्याचे दर्शवणे हा सगळा गोंधळाच्या रचना विशेषाचा भाग असतो. उत्तर पेशवाईत शाहिरांनी शाहिरी परंपरा गोंधळाच्या रंगभूमीवरून विकसित केल्याचे दिसून येते, तर तमाशाच्या आकृतिबंधाचा उदय गोंधळातून झाल्याचे दिसून येते.

आज विज्ञानयुगात या विधिनाट्याची परंपरा चालवणाऱ्या गोंधळ्यांना स्वतःच्या मागतेपणाचा आणि भिक्षुकी वृत्तीचा कंटाळा आला आहे. आपणही समाजात काही उत्पादक व्यवसाय करावा आणि भिक्षुकीचा त्याग करावा या विचारातून गोंधळी निरनिराळे व्यवसाय करू लागले आहेत. शासनाच्या बदलत्या धोरणानुसार आणि शिक्षणाचा झालेला खेडोपाडी प्रसार यांमुळे त्यांच्या पिढीतील काही मुले सरकारी नोकऱ्या करू लागली आहेत. त्यामुळे या भटक्या विमुक्त समाजाला स्थिरता मिळू लागली आहे. समाजपरिवर्तनाच्या या प्रक्रियेत गोंधळ्यांचे व्यवसायांतर झाले तर त्यात आश्चर्य नाही.

असे असले तरी गोंधळ्यांनी या विधिनाट्यातून स्वतःची स्वतंत्र रंगभूमी विकसित केली. त्याला संरचनात्मक स्वरूप दिले. एक प्रभावी संवादमाध्यम म्हणून समाजात भक्तीची ज्योत तेवत ठेवण्यासाठी आणि उद्‌बोधनासाठी ही रंगभूमी वापरली. गोंधळ्यांची ही स्वतंत्र प्रकटन संस्था आहे. लोकरंगभूमीवरील गोंधळ हा एक अत्यंत लक्षणीय नाट्याविष्कार आहे.

●

**आप्पासाहेब पाटील**
भा. वि. अ. वि. अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे
चलभाष : ९६७३५६७३५८





लेख

निखिल कुलकर्णी

# पु.ल.: देवाघरचे देणे

सोमवार, १२ जून २०००, संध्याकाळी ऑफिसमधून घरी परत येत होतो. तेव्हा मी फर्ग्युसन कॉलेज रस्त्यावर राहायचो आणि संध्याकाळी विववेवाडीहून दुचाकी चालवत येणे हा काही फारसा सुखाचा मामला नसायचा. वैताग, त्रागा, राग, अशा सगळ्या भावनांचं एक विचित्र मिश्रण डोक्यात तयार झालेलं असायचं. अनंत वाहने, त्याहून जास्त स्पीड ब्रेकर, सगळीकडे भरून राहिलेला धूर, वाहने गप्पा मारत आहेत असे वाटावे इतके अव्याहत हॉर्न, चालणारी माणसे, मधेच थांवणाऱ्या रिक्षा, वस, त्यांचे फाटलेले पत्रे, अखंड चेहरा रुमालाने वांधून घेऊन त्यावर गॉगल चढवून पाठीवर बाळाऐवजी कॉलेजची सॅक लावून बाणासारख्या तडक निघालेल्या लक्ष्मीवाईच्या लेकी, हे सगळं चुकवत, ऐकत, घडकत यायचं म्हणजे अगदी नको होत असे. त्याच्यात त्या वेळेला फर्ग्युसन रस्ता, जंगली महाराज रस्ता हे दुहेरीच होते. त्यामुळे त्याच्यावर अखंड दुतर्फा वाहनांचा नद थांवलेला असे. तर त्या दिवशी मी गुडलक चौकापाशी पोचलो. तिथे भयंकर गर्दी दिसत होती. गाड्या सर्व बाजूंनी थांबलेल्या होत्या. बरेच पोलीस शिपाई, इन्स्पेक्टर वगैरे उभे होते. माझं घर अगदी हाकेच्या अंतरावर आलं असताना आता अचानक काय झालं या विचारानं भयंकर अस्वस्थ व्हायला झाले होते. गर्दीच इतकी होती की, गाडी हलवणेदेखील अशक्य होते. शेवटी एक पोलीस मामा तिकडे चालत आले त्यांना काय झाले ते विचारले. त्यांनी जे उत्तर सांगितले ते ऐकून धक्काच बसला. बाजूच्या प्रयाग हॉस्पिटलमधे पु. ल. गेले काही दिवस ॲडमिट होते. ते आज गेले. एक अत्यंत सुन्न करणारी घटना होती. गाडी बाजूला लावून अंत्यदर्शन घेणे पण शक्य नव्हते. ज्या माणसाचे मराठी भाषेवर अलौकिक प्रेम होते आणि तितकेच किंवा त्याहून थोडे जास्तच मराठी भाषकांचे ज्यांच्यावर प्रेम होते अशा एका अवलियाचा श्वास आज थांबला होता. काय बोलावं.. सुन्न होऊन बॅरिकेडमधून दवाखान्यात काही दिसतंय का ते बराच वेळ पाहत बसलो होतो. अशी घुसमट पहिल्यांदाच झाली होती.

मराठी भाषा समृद्धच आहे. लेकुरवाळी आहे. तिला कितीतरी सर्वमान्य आणि लोकोत्तर अशी साजरी अपत्यं आहेत. अगदी मुकुंदराज, माऊलीपासून सुरू होत, एकनाथ, तुकोबाराय, समर्थ, छत्रपती, शंभूराजे, लोकमान्य, स्वातंत्र्यवीर असे करत करत खांडेकर, कुसुमाग्रज, विंदा, नेमाडे यांनी त्यांच्या मायेची श्रीमंती वर्धिष्णूच ठेवलेली आहे; पण इतकं सगळं उदंड वैभव असून देखील तिचा सगळ्यात लाडका लेक मात्र पुरुषोत्तम लक्ष्मण देशपांडेच असावा असं एक मला वाटत आलेलं आहे. आपापल्या क्षेत्रात पारंगत असलेल्या मोठ्या-मोठ्या भावंडांमध्ये, सरस्वतीच्या बहुतेक सगळ्या आविष्कारात मनसोक्त संचार करून देखील, देवळातली घंटा वाजवणाऱ्या बापाच्या धोतराचा सोगा ओढून पळून जाणाऱ्या पोराइतकं निरागस राहिलेलं हे शेंडेफळ, माय मराठीलाच काय; पण ती भाषा कळणाऱ्या प्रत्येकालाच लाडकं आणि अगदी आपल्या घरचंच वाटत आलेलं आहे. त्यांच्याविषयी मी खरं तर काय लिहावं हा प्रश्नच आहे. माझी ती पात्रताच नाही. तरी त्यांच्या साहित्याचा एक सामान्य वाचक म्हणून चार शब्द लिहिण्याची आगळीक करत आहे.

साहित्य, कला, संगीत, नाट्य, अभिनय, दिग्दर्शन, कथाकथन, वक्तृत्व या सगळ्या क्षेत्रांतला त्यांचा समर्थ आणि तितकाच सहज वावर पाहिला की, हा एकच मनुष्य होता यावर विश्वास बसणं कठीण आहे. एक अत्यंत बहू आयामी आणि तरीही तितकंच निगर्वी माणूस माझ्या तरी माहितीत नाही. पु. लं.नी मराठी भाषेला दिलेल्या प्रत्येक गोष्टीची मराठी मनाला भुरळ पडलेली आहे. मग त्यांचे वाऱ्यावरची वरात असो, बटाट्याची चाळ असो किंवा अपूर्वाई/पूर्वरंग असो, जसंच्या तसं चित्र शब्दातून उभं करण्याची त्यांची हातोटी अद्वितीय आहे. यातले विनोद हे कालातीत आहेत. त्यांना कुठल्याही वेळेचं, काळाचं, कुठल्या बातमीचं किंवा इतर कशाचंच बंधन नाही. अमेरिकेतले शेक्सपिअरचे थडगे असो की, बाळ-गोपाळांनी रंगवलेला 'दारू म्हणजे काय रे भाऊ' चा फार्स असो. समाजातल्या अनिष्टतेवर आणि व्यंगावर बोट ठेवून, खपली न काढता अलगद उपचार करण्याची किमया पुलं इतकी कुणाला साध्य झाली असेल असे मला तरी वाटत नाही.

रंजन हे खरं तर कलाकाराचे पहिले ध्येय असले पाहिजे. लोकांना तुमचं आवर्जून ऐकावं, वाचावं, पाहावं असं वाटायला हवं. तरच ते ऐकतील, वाचतील आणि पाहतील आणि मग त्यातूनच पुढे तुम्हाला एक विचारवंत म्हणून जे सांगायचे आहे ते तुम्ही सांगितले, तर ते त्यांच्या पचनी देखील पडते. म्हणजे एका अर्थाने रंजन हे साध्य जरी नसले, तरी जे





अनुक्रमणिका

साध्य करायचे आहे त्याच्यासाठी साधन म्हणून रंजनाचा मोठ्या खुबीने उपयोग करता आला पाहिजे आणि तो पु. लं.नी अतिशय सार्थपणे केलेला आहे. किंवा तो कसा करता येऊ शकतो याचा दंडकच घालून दिलेला आहे असेच म्हणावे लागेल.

पु.लं.चं असा मी असामी असो, अंतू बर्वा असो की, नारायण असो, सामान्य माणूस खिळून जातो. मनमुराद हसत जातो. मन लावून ऐकत जातो आणि अचानक 'ते गुरुदेव हाय नी, ते हिमालय मंदी एक टांग वर करून तप करते' च्या रूपाने हळूच एक विचार मनात उतरतो. अंतू बर्वा जेव्हा थोट्या पांडूचा उल्लेख करतो, तेव्हा मनातल्या मनात काहीतरी टोचत राहतं. नवऱ्या मुलीला निरोप देणारा नारायण डोळ्यापुढे दिसू लागतो आणि त्याचे इंग्रजी ऐकून हसावं की, रडावं तेच सुचत नाही. खानसाहेबांच्या सतारीवर जीव ओवाळून टाकणारे रावसाहेब आपल्या समोर जिवंत होऊन उभे राहतात. त्यांचं 'जिम्या भडव्या ये कि तिच्या ×××' हे प्रत्यक्ष ऐकू यायला लागतं. मी आणि माझा शत्रुपक्ष मघला कुलकर्णी आणि त्याच्या पुढे हातात वीट घेऊन उभे असलेले पु. ल. दिसू लागतात. गुलमर्गचे फोटो बघताना ते घोडं आणि त्या घोड्यावर बसलेल्या यजमानीण बाई दिसू लागतात. हसू येतंच. यायलाच हवं; पण आपण काय करू नये याची बारीकशी जाणीव देखील होऊन जाते आणि ती कायमची लक्षात देखील राहते. हा एक प्रकारचा संस्कारच आहे.

उगाचच कुणीतरी नागपूरचा माणूस भेटल्यावर आता हा संत्री खायला नागपूरला कधी बोलावतो याची वाट पाहिली जाते. कुठल्याही पानपट्टीवर गेल्यावर तिथे कुठे तो चित्रांनी भरलेला आरसा दिसतो का ते नकळत पाहिले जाते. तिथे गेल्यावर, खुद्द वैकुंठाला निघालेल्या श्रीकृष्णाला देखील न मिळणाऱ्या तंबाखूची महती प्रकर्षाने जाणवते. कुठल्याही पारशाला बोलताना पाहून पेस्तनजीच दिसू लागतो. कुठल्यातरी लग्नात गेल्यावर तिथला नारायण कोण हे आपण शोधू लागतो आणि नकळतच मग त्याच्या पोराला उगाचच एखांदी आईसक्रीमची कांडी नाहीतर एखादे चॉकलेट घेऊन द्यावेसे वाटू लागते. एखाद्या थकलेल्या म्हातारबुवांना पाहून हरितात्या आठवतात. मग त्यांच्याशी दोन गोष्टी बसून बोलाव्याशा वाटतात. पायाला हात लावून नमस्कार करावासा वाटतो. बेळगाव, लेडी सिटारीस्ट, मांडी खाजवणारा तब्बलजी, उंटाच्या शेपटीच्या बुडख्याचा मुका, मुलाला मारलेली 'मास्टर शंकर' ही हाक, नानू सरंजामे आणि त्याची 'मी झोपतो' करून हिमालयाची उशी, लग्नाला जातो मी म्हणणारा नारद, मी आपल्या साधनेत व्यत्यय तर नाही ना आणला म्हणणारा गटणे, दुसऱ्या बाजीरावाचे हस्ताक्षर किंवा या एकदा.. दाखवीन मजा, कोटाचे माप घेणारा शिंपी, काबुलीवाला, ऋग्वेदी आजोबा, इकडून तिकडे जाणारी दोस्त राष्ट्रांची विमाने, हाय अल्ला ये उर्दू से बचाव, अर्जुनाला कशाला पाठवला? साला कंडम माणूस किंवा पोलीस नाहीतर काय चोर हाय?, प्रेमलताबाई सद्रे, ढोशा कडक भाजना, चितळे मास्तर, एका हौदाला ऽ ऽ ऽ, यमी पेक्षा दहापट गोरी ह्या अशा घटना, पात्रे आणि संवाद वेळी-अवेळी आठवत राहतात. जगाच्या कुठल्याही पाठीवर वेगवेगळ्या रूपात भेटत राहतात. आयुष्याच्या अनेकानेक प्रसंगातून काळवंडून गेलेल्या मनाचा एक मोठाच्या मोठा कप्पा ही पात्रे निरागस करत राहतात.

आइनस्टाइन त्याच्या सेमिस्टरच्या शेवटच्या तासाला मुलांना एक प्रश्न विचारायचा की, तुम्ही गेल्या वर्ष-सहा महिन्यात माझ्या विषयातलं काय शिकलात म्हणून. मुलं काही काही उत्तरे द्यायची. अमुक सूत्र शिकलो, तमुक प्रमेय शिकलो वगैरे. मग आइनस्टाइन त्यांना सांगायचा की, ती सगळी माहिती झाली, शिक्षण नव्हे. त्याची शिक्षणाची व्याख्या मोठी विलक्षण होती. तो सांगायचा की, या वर्गात आपण जे शिकलो त्यातलं बहुतेक सगळं तुम्ही पुढच्या वर्षभरात अगदी ठार विसरून जाल आणि त्याच्या नंतर देखील जे तुमच्या लक्षात राहील आणि ज्याचा तुम्ही प्रत्यक्ष वापर कराल ते तुमचे शिक्षण!!...शिक्षणाच्या या व्याख्येने बघितलं, तर आज वयाच्या चाळीशीत देखील इयत्ता दुसरीत असताना कॅसेट प्लेयरवर ऐकलेली म्हैस आठवते, रावसाहेब आठवतात, नारायण आठवतो, आणि मन नकळत हळवं होऊन जातं. एखाद्या लेखकाने, फनकाराने अजून काय द्यायचे असते समाजाला?

पु. ल. हे मला तरी मराठीतले सांताक्लॉज वाटतात. भली मोठी पांढरी शुभ्र दाढी, लाल भडक कपडे, तसलीच साळढाळ टोपी, तुंदिलतनू आणि सगळ्यांत महत्त्वाचे म्हणजे त्याचे हो हो हो करून मोठमोठ्याने दिलखुलास हसणे..यातल्या प्रत्येक गोष्टीत एक निरागसता आहे. सांताक्लॉज प्रत्यक्ष आहे की नाही ते ठाऊक नाही; पण त्याच्या असण्याची कल्पना देखील त्याच्या इतकीच निरागस आहे. तो ख्रिसमसच्या आदल्या दिवशी रात्री बरोबर १२ वाजता घराच्या धुराड्यातून आत येतो. वर्षभर चांगल्या वागलेल्या मुलांसाठी खाऊ, खेळणी, कपडे ठेवतो. ग्लासभर दूध पितो आणि आल्यापावली त्याच्या रुडॉल्फ नावाच्या लाल नाकाच्या रेनडिअरच्या गाडीत बसून निघून देखील जातो. कुठून तरी देवाघरून येतो आणि कुठे तरी देवाघरी परत जातो. पण दुसऱ्या दिवशी सकाळी उठल्या उठल्या, ख्रिसमस ट्रीच्या खालची खाऊ, खेळणी आणि कपडे धावत जाऊन घेताना आणि रिकामा झालेला दुधाचा ग्लास बघताना हरखून गेलेल्या डोळ्यातून त्याची निरागसता मात्र ठेऊन जातो. तेच त्याचं चिरायू अस्तित्व.. ●

**निखिल कुलकर्णी**
२४२४, हेकेट प्लेस,
सॅन होजे, कॅलिफोर्निया- ९५१२४
चलभाष : -१(३०९) ८६८-१९६०
इ-मेल : nskulkarni@gmail.com



समीक्षा

डॉ. अजय देशपांडे

# वसंत आबाजी डहाके यांची विचारप्रवृत्त करणारी कविता



**नाशिक येथील कुसुमाग्रज प्रतिष्ठानचा 'जनस्थान पुरस्कार' ज्येष्ठ कवी, कादंबरीकार, समीक्षक प्रा. वसंत आबाजी डहाके यांना २७ फेब्रुवारी रोजी प्रदान करण्यात आला. त्यानिमित्ताने प्रा. डहाके यांच्या कवितेची सामर्थ्ये विशद करणारा समीक्षक डॉ. अजय देशपांडे यांचा हा लेख.**







वसंत आबाजी डहाके हे सुमारे सहा दशकांपासून कविता, ललित गद्य, कथा, कादंबरी, एकांकिका, नाटक या ललितवाङ्मय प्रकारांसह संशोधन, समीक्षा व कलाविषयक लेखन, असे विविध प्रकारचे वैशिष्ट्यपूर्ण लेखन करीत आहेत. मराठी वाङ्मयकोश, वाङ्मयीन संज्ञा संकल्पना कोश यांसह महत्त्वाची काही संपादने त्यांनी केली आहेत. ते उत्तम चित्रकार आहेत. त्यांची रेखाटने म्हणजे रेषांच्या भाषेतील कविताच होय.

अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदासह अनेक मानसन्मान आणि साहित्य अकादेमी पुरस्कारासह अनेक मानाचे पुरस्कार त्यांना मिळालेले आहेत.

प्रा. वसंत आबाजी डहाके यांचे एकूणच साहित्य मराठी भाषेतील वैशिष्ट्यपूर्ण असे साहित्य आहे. रूपबंध, आशय, विचार आणि शैली या चारही पातळ्यांवर त्यांचे साहित्य अनन्यसाधारण आहे. आधुनिक मराठी साहित्याच्या प्रवाहात प्रा. डहाके यांच्या एकूणच साहित्याचे स्थान आणि योगदान महत्त्वाचे आहे.

प्रा. वसंत आबाजी डहाके यांचे सहा कवितासंग्रह आहेत. 'योगभ्रष्ट' (१९७२), शुभवर्तमान (१९८७), शुनःशेप (१९९६), चित्रलिपी (२००६), रूपांतर (२०१६) वाचाभंग (२०१७) या सहा कवितासंग्रहातील प्रा. डहाके यांची कविता मराठी काव्यलेखनाला नवे आयाम, नवे परिमाण देणारी आहे. प्रा. डहाके यांच्या कवितेची काही वैशिष्ट्ये या निबंधात नमूद करावयाची आहेत.

प्रा. डहाके यांनी कवितेसह गद्यलेखनातूनही कवितेविषयीचे गंभीर असे चिंतन केलेले आहे. प्रा. डहाके यांची कवितेविषयीची विधाने अन्वर्थक आहेत, संवेदनशील माणसांना विचारप्रवृत्त करणारी आहेत.

''कवितेतून आपला काळ, समाज, संस्कृती यांची अभिव्यक्ती होत असते. आपल्या काळातले प्रश्न, समाजव्यवस्थेतील दांभिकतेचं निराकरण अशा अनेक गोष्टी कवितेतून येत असतात. कविता अस्वस्थ करते, तशीच ती शांतही करते. जगण्याची खोल समज कविता देत असते.'' (कवितेविषयी स्वरूप प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठ २५१) अशा शब्दांत कवितेचे कार्य प्रा. डहाके यांनी नमूद केले आहे. मराठी भाषेसह साहित्यसंस्कृतीची परंपरा असणाऱ्या जगातील सर्वच भाषांतील कवितेने काळ समाज आणि संस्कृती यांची अभिव्यक्ती केलेली आहे. कविता हा काळ, समाज, संस्कृती आणि भाषा यांसंदर्भातील वास्तवाचे अंकन करणारा ऐतिहासिक दस्तऐवज असतो. प्रा. डहाके लिहितात, ''कवितेनं आपल्या संवेदना सजग होतात; आपल्या अस्तित्वाचं भान येतं आणि एक व्यक्ती म्हणून व



अनुक्रमणिका







**"कविता लिहिणं, वाचणं ही एक राजकीय कृती आहे, याचं भान आपण बाळगलं पाहिजे. तिच्यातली शक्ती व्यवस्थेत परिवर्तन घडवून आणू शकते. ती अन्यायांना मुखरित करते. वेदनांना शब्द देते, शोषितांना धीर देते आणि शोषकांच्या विरोधात आवाज उठविण्यास मदत करते. कविता ही एक आध्यात्मिक कृतीही आहे. जगण्याचा, अस्तित्वाचा अर्थ शोधण्याच्या प्रवासात ती आपल्या सोबत असते. निर्णयाच्या क्षणाच्या खडतर कसोटीतून जात असताना ती अंतरात्म्याचा बोल होऊन येते. कविता माणसामाणसातला संवाद आहे." (कवितेविषयी पृ. २५२) असे प्रा. डहाके कवितेविषयी नमूद करतात. डहाके यांची कविता वाचताना कवितेविषयी त्यांनी मांडलेल्या विचारांचा आणि भूमिकांचा वारंवार प्रत्यय येतो.**



समाजाचा एक घटक म्हणून अर्थपूर्ण जीवन जगण्याचं बळ प्राप्त होतं. कवीचं ऋण मोठं आहे; कवितेचं योगदान अपार आहे." (कवितेविषयी पृ.२५३) हे खरे आहे. कविता ही तिच्या युगाच्या वास्तवाविषयीचे भाष्य असते. कविता विचार आणि ऊर्जा देत असते. कविता लढण्याचं बळ देते, विधायक कृतिशीलतेचे सामर्थ्य देते. कविता नैतिकतेचा आग्रह धरणारे, वास्तवाचे भान देणारे कवीचे सजग असे विधान असते. समाजमनातला कल्लोळ कवीने कवितेच्या माध्यमातून व्यक्त केलेला असतो. "कविता लिहिणं, वाचणं ही एक राजकीय कृती आहे, याचं भान आपण बाळगलं पाहिजे. तिच्यातली शक्ती व्यवस्थेत परिवर्तन घडवून आणू शकते. ती अन्यायांना मुखरित करते. वेदनांना शब्द देते, शोषितांना धीर देते आणि शोषकांच्या विरोधात आवाज उठविण्यास मदत करते. कविता ही एक आध्यात्मिक कृतीही आहे. जगण्याचा, अस्तित्वाचा अर्थ शोधण्याच्या प्रवासात ती आपल्या सोबत असते. निर्णयाच्या क्षणाच्या खडतर कसोटीतून जात असताना ती अंतरात्म्याचा बोल होऊन येते. कविता माणसामाणसातला संवाद आहे." (कवितेविषयी पृ. २५२) असे प्रा. डहाके कवितेविषयी नमूद करतात. डहाके यांची कविता वाचताना कवितेविषयी त्यांनी मांडलेल्या विचारांचा आणि भूमिकांचा वारंवार प्रत्यय येतो. डहाके यांनी आपल्या काळाचा, समाजाचा, संस्कृतीचा प्रतिनिधी या नात्याने समकालीन वास्तवाची जाणीव करून देणारी गंभीर कविता लिहिली.

विसाव्या आणि एकविसाव्या शतकांतील सामान्य माणसांची व्यथा, वेदना, घुसमट, कोंडी डहाके यांनी कवितेतून मांडली आहे. 'मोरासारखा उघडून एका शतकाच्या दुःखाचा पिसारा' ही कविता आपल्याला भेटते. वर्तमानाचा भीषण चेहरा दाखवते.

– *मी पाहतो माझ्या पिढीतील शिक्षित मस्तकांच्या चिंधड्या उडताना.* (योगभ्रष्ट, पृ. ९३)

– *हे लाकूड तोडणाऱ्या, पॉलिश करणाऱ्या*
*रिक्षा चालवणाऱ्या अत्यंत सामान्य माणसा,*
*जागृत होऊ दे तुझ्या अंतःकरणातील वादळांचे समुद्र.* (योगभ्रष्ट)

–*वाऱ्यावर भिरभिरणारी सामान्यांची नश्वर आयुष्ये* (योगभ्रष्ट, पृ. १०८)

– *मी ऐकतोय माझे कान फुटेपर्यंत भोंगळ न्यायतत्त्वांच्या जर्जर ध्वनिमुद्रिका* (योगभ्रष्ट, पृ. ३)

–*शहराची जीभच कुणी उखडून काढावी*
*अशी शांतता.* (शुभवर्तमान, पृ. १३)

– *माझा देश हळूहळू मालवत चाललाय*
*भयंकर अपराधांच्या टाचांखाली*
(शुभवर्तमान, पृ. १६)

– *दंगलग्रस्त शहरातल्या निर्मनुष्य*
*रस्त्यांसारखा मेंदू*
*सुन्न स्तब्ध*
*कसं हे शतक अंगावर कोसळत चाललंय* (शुनःशेप, पृ.५)

– *जमावानं पेटवून दिलेल्या घरातल्या अर्धवट जळक्या प्रेतासारखा*
*उच्चार तडफडतो आणि कोळसा होतो* (शुनःशेप, पृ.५)

– *दुःखी आणि खिन्न माणसांचं वाढ खुंटलेलं गाव* (शुनःशेप, पृ. १८)

– *रस्त्यावर आहेत तुझ्या माझ्यासारखीच दुःखी माणसे* (शुनःशेप, पृ. २९)

– *दहशतीचा काळा खेकडा पाठलाग करतो* (शुनःशेप, पृ. ४३)
*अगदी हळू असा नाच सुरू आहे*
*मनुष्यद्वेषाचा*
*मुखवटे घालून गूढ अंधारात*








*राजकीय डावपेचांच्या* (शुनःशेप, पृ. ४५)
*-शहर दाखवतं आपला क्रूर चेहरा अचानक*
*आणि आपल्या सामान्य इच्छांचे डोळे*
*थिजतात भयानं* (शुनःशेप, पृ. ६५)

वेगवेगळ्या संग्रहातील वेगवेगळ्या कवितांतील वरील सुट्या सुट्या ओळींमधून आपल्या सभोवतीच्या सामाजिक वास्तवाचे अंकन झाले आहे. जगणे नावाचे मरण नित्य अनुभवणाऱ्या माणसांचे श्वासनिःश्वास डहाके यांची कविता व्यक्त करते. सर्वत्र अनैतिक, अराजकीय, अमानुष कृतिउक्ती, व्यवहार सुरू असताना नैतिकता, सदाचार या मूल्यांना चिकटून खुरडत खुरडत जगणाऱ्या सामान्य माणसांच्या दुःखाचे शतक अशी ओळख या शतकाची झालेली आहे. सदाचाराचा, नैतिकतेचा कोणताच स्वर बाहेर पडू न देण्याची काळजी सर्व पातळ्यांवर घेणाऱ्या दमनकारी यंत्रणांची साम्राज्ये दरदिवशी वाढत असल्याचे वास्तव ही कविता शांतपणे आणि निर्भयपणे सांगते. वरील सर्वच ओळी या संदर्भात लक्षणीय आहेत.

प्रा. डहाके यांच्या कवितेतील ही सामाजिक आणि राजकीय जाणीव 'चित्रलिपी' या संग्रहात अधिक प्रखरपणे व्यक्त झाली आहे. समूह जीवनाचा शोकात्म प्रत्यय देताना या कवितेतील वरवर साधी, सुबोध वाटणारी शब्दकळा गंभीर पातळीवरचा, अन् हेलावून टाकणारा, सुन्न करणारा, नैतिकतेचे मूल्य जपण्याचा विचार रुजवणारा सखोल अर्थ मनात रुजविते.

*''बरं, प्रश्न तरी काय आहे?*
*अयोध्येविषयीचा आहे काय? मग विचारू नको.*
*गुजरातविषयीचा आहे काय? मग विचारू नको.*
*शेतकऱ्यांच्या आत्महत्यांविषयीचा आहे काय?*
*मग विचारू नको.*
*दिवसेंदिवस वाढत चाललेल्या असुरक्षिततेविषयीचा*
*आहे काय? मग विचारू नको.*
*सुशिक्षितांच्या बेकारीविषयी आहे काय?*
*मग विचारू नको.*
*पिण्याच्या पाण्याविषयीचा आहे काय?*
*मग विचारू नको.*
*सरकारी धोरणांविषयीचा आहे काय?*
*मग विचारू नको.*
*सार्वजनिक नीतिमत्तेविषयीचा आहे काय?*
*मग विचारू नको.*
*राजकारणाविषयीचा आहे काय? मग विचारू नको.*
*आदिवासी बालकांच्या अपमृत्यूविषयीचा*
*आहे काय? मग विचारू नको.''*
(चित्रलिपी, पृ. ५)



*''अजिबात प्रश्न न विचारणारी पिढी तयार करणं*
*हा आमचा यापुढचा राष्ट्रीय प्रकल्प आहे.''*
(चित्रलिपी, पृ.६)

*''पेटत चाललं आहे एकेक घर परस्पर सौहार्दाच्या*
*काटक्यांनी साकारलेलं.''* (चित्रलिपी, पृ.८)

*''रस्त्यावर टाकून दिलेल्या मुलासारखा*
*पडलेला आहे सगळा देश''* (चित्रलिपी, पृ.९)

*''माझ्या या देशातले सगळेच लोक संत्रस्त दिसतात;*
*काही बोलतात, काही नाही.''* (चित्रलिपी, पृ. ८)

*''लोकशाही, धर्मनिरपेक्ष समाज हे कोणत्या भाषेतले*
*दुर्बोध शब्द आहेत*
*पदोपदी कानावर पडत असतात*
*हा धर्म, तो धर्म, ही जात, ती जात.*
*शतका मागून शतकं सरतात तरी*
*उगवलेली नसते नवी पहाट*
*दर वळणावर होत असतो*
*मनात उगवलेल्या स्वप्नांचा घात''*
(चित्रलिपी, पृ.१३)

*''आता या आपल्या युगाच्या सगळ्या विधायक शक्यता*
*संपलेल्या आहेत की काय, असं वाटतं''*
(चित्रलिपी, पृ.१४)

*''कोणते जग आपण निर्माण करीत आहोत*
*आणि त्याचं उत्तरदायित्व कुणावर आहे*
*याची कुणाला जाणीव नाही.''*
(चित्रलिपी, पृ. १४)

“प्रा. डहाके यांच्या कवितेत कृषिनिष्ठ जनसमूहांच्या व्यथावेदनांचे चित्रण येते. दरदिवशी अधिकच जीवघेण्या होत जाणाऱ्या शेतीच्या अर्थकारणाने शेतकऱ्यांचे जगणे पार विस्कटून गेले आहे. शेतकऱ्याच्या या विस्कटलेल्या जगण्याचे वास्तव या कवितेत येते. या शतकाने शेती आणि शेतकऱ्यांच्या जगण्यावरच घाव घातला आहे. शेती, शेतकरी आणि एकूणच गावगाडा याविषयीची चिंता या कवितेतून व्यक्त होत राहते.”



*''सगळीच मेंढरं सुरीखाली आहेत आणि*
*घाईघाईनं हिरवा चारा चयळून घ्यावा*
*असं आहे की काय असं वाटतं.''* (चित्रलिपी, पृ. १४)

*''निखाऱ्यासारखे फुलावे, तर सगळेच विझलेले आहेत विचार,*
*राख झालेले सिद्धांत''* (चित्रलिपी, पृ. १६)

*''मस्तकात खिळे ठोकून बसवलेल्या मथळ्यांची वृत्तपत्रे''* (चित्रलिपी, पृ. २२)

या आणि अशा कितीतरी ओळी आपल्या विचारशीलतेला आवाहन करतात. ही कविता विसाव्या शतकाची दु:खं कवेत घेणारी कविता आहे. सामूहिक, सार्वत्रिक अध:पतनाविषयीची चिंता प्रत्यक्षाप्रत्यक्षपणे या कवितेतून व्यक्त होत राहते. विचारवंतांचे, तत्त्वज्ञांचे, तज्ज्ञांचे मौन अथवा बधिरपण, कलावंत, लेखक, तत्त्वज्ञ, विचारवंत यांची मुस्कटदाबी, राजकारणाचे आणि एकूणच व्यवस्थेचे झालेले अध:पतन, राजकीय पक्षपद्धतीला आणि लोकशाही व्यवहारांना आलेले हुकूमशाहीचे जुलमी आणि विकृत रूप, गुन्हेगारी, चंगळवाद, अमानुषता, सामान्यांची ससेहोलपट, विषण्णता, निराशा, अगतिकता, सामान्यांवर होणारे अन्याय या आणि अशा व्यामिश्र वास्तवाचे कितीतरी आयाम डहाके यांची कविता मांडते. दरदिवशी अधिकच भयानक होत जाणाऱ्या वास्तवाचा क्रूर चेहरा दाखवित ही कविता आपल्याला अंतर्मुख करते, विचारप्रवृत्त करते. वर उद्धृत केलेल्या ओळी यासंदर्भात लक्षणीय आहेत.

प्रा. डहाके यांच्या कवितेत कृषिनिष्ठ जनसमूहांच्या व्यथावेदनांचे चित्रण येते. दरदिवशी अधिकच जीवघेण्या होत जाणाऱ्या शेतीच्या अर्थकारणाने शेतकऱ्यांचे जगणे पार विस्कटून गेले आहे. शेतकऱ्याच्या या विस्कटलेल्या जगण्याचे वास्तव या कवितेत येते. या शतकाने शेती आणि शेतकऱ्यांच्या जगण्यावरच घाव घातला आहे. शेती, शेतकरी आणि एकूणच गावगाडा याविषयीची चिंता या कवितेतून व्यक्त होत राहते. पुढील ओळी यासंदर्भात लक्षणीय आहेत.

*''तसे हेही दिवस जातील*
*दिवे लागणीच्या वेळी खेड्यांतल्या घरांतून*
*पुटपुटले जातात म्हातारपणातले शब्द*
*आणि वाढत्या काळोखात विरघळून जातात.''* (चित्रलिपी, पृ.३०)

*''वर्तमानपत्रांच्या कागदांवर*
*आत्महत्या केलेल्या शेतकऱ्यांची प्रेतं आढळली.*
*आजकाल अशी रोजच दिसत असतात.''* (रूपांतर, पृ.६६)

*''पिसं काढून टाकलेल्या निर्जीव पाखरासारखं*
*दिसायला लागलं आहे शेत''* (रूपान्तर, पृ.६८)

*''बाहेरच्या आणि आतल्या किडीनं त्रस्त झाल्यासारखी*
*एक एकटी माणसं*
*धुऱ्यावर बसून पाहात आहेत शेतांची प्रेतं.''* (रूपान्तर, पृ.६८)

*''घरांच्या डाक्यात तिडिकेसारखं घुमत राहातं*
*मोकाट कुत्र्याचं विव्हळणं*
*सगळं गावच नागाचं विष भिनल्यासारखं*
*काळंठिक्कर पडत जातं हळूहळू''* (रूपान्तर, पृ. ६९)

या आधी इतरही काही कवितांमधून शेतकऱ्याचे, शेतीचे आणि पर्यायाने गावगाड्याचे वर्तमान साकारले आहे. गेल्या काही दशकांत शेतकऱ्यांच्या आत्महत्यांच्या घटना सातत्याने घडत आहेत. सरकारी उफराटी धोरणे, दुष्काळ, नापिकी, कर्जबाजारीपणा, फसलेले अर्थकारण यांसारखे अनेक घटक शेतकऱ्यांच्या आत्महत्यांच्या

मागच्या कारणांमध्ये समाविष्ट असतीलही; पण आपण एकटे आहोत, हे सरकार, हा देश, हे राज्य, ही माणसे, हा समाज आपल्या सोबत नाही, आपण एकाकी आहोत, ही भावना शेतकऱ्यांच्या मनात निर्माण होऊन त्याने आत्महत्येचा मार्ग पत्करणे हेही एक या आत्महत्यांमागचे कारण असू शकते आणि जर हे एक कारण असेल, तर हे आपल्या समाजव्यवस्थेचे, देशाचे आणि शासनाचे न पुसता येणारे अपयश आहे, ही जाणीव या कवितांमधून होते. 'रूपान्तर' या संग्रहातील 'बोलणं' या शीर्षकाची कविता या संदर्भात अन्वर्थक आहे.

*''दोन म्हाताऱ्या बसलेल्या आहेत एकमेकींसमोर*
*घरासमोरच्या ओट्यावर, संध्याकाळी,*
*त्या काहीही बोलत नाही आहेत, कितीतरी वेळ झाला तरी,*
*नुसत्याच बसून आहेत एकमेकींसमोर*
*त्या बघत नाही आहेत एकमेकींकडे*
*त्यांची डोकी खाली झुकलेली आहेत*
*संध्याकाळी विरत चाललेल्या उजेडात*
*त्या बसलेल्या आहेत एकमेकींसमोर,*
*रक्त साकळल्यासारख्या.*
*गावात आणखीही कुठं कुठं, संध्याकाळी, ओट्यावर,*
*नाही तर घराच्या पायऱ्यांवर, किंवा अंगणात*
*बसलेल्या आहेत दोन किंवा तीन म्हाताऱ्या,*
*एकमेकींसमोर, काहीही बोलत नसलेल्या.*

*त्या मनातल्या मनात बोलत असतील?*
*एंड्रिनविषयी, गळफासाविषयी, विहिरींच्या तळांविषयी,*
*स्वतःच रचलेल्या सरणांविषयी, गोळीबारांविषयी.*
*कर्जांविषयी, सावकारांच्या तगाद्यांविषयी.*
*आत्महत्या केलेल्या आपल्या मुलांविषयी, नवऱ्यांविषयी?*

*त्या बोलताना दिसत नाहीत, पण बोलत आहेत*
*एकमेकींशी, अंधारून आलेल्या आभाळाविषयी,*
*आतल्याआत दाटलेल्या स्तब्धतेविषयी.*
(रूपान्तर, पृ.६४)

या कवितेचे वैशिष्ट्य असे की, कॅमेऱ्याने शूटिंग करावे तशी दृश्यात्मकता या कवितेच्या ओळीओळीतून साकार झाली आहे. गावात संध्याकाळी घरासमोरच्या ओट्यांवर, पायऱ्यांवर, अंगणात बसलेल्या म्हाताऱ्या साक्षात डोळ्यांसमोर येतात. त्यांचे एकमेकींकडे न पाहता, एकमेकींशी न बोलता एकमेकींसमोर स्तब्ध बसणे आपल्या डोळ्यासमोर येते. ही दृश्यात्मकता या कवितेच्या आशयाचे मोठे बळ आहे.

या कवितेतल्या म्हाताऱ्या एकमेकींशी बोलत नाही आहेत. त्यांना एकमेकींशी शब्दांनी बोलण्याची गरजच नाही. त्यांना एकमेकींशी शब्द, स्पर्श, नजर यांच्याद्वारे संवाद साधण्याची गरजच नाही. एकमेकींचे एकमेकींसमोर असणेदेखील संवादात्मक आहे. हे 'बोलणे' शब्दांच्या, नजरेच्या, स्पर्शाच्या पलीकडचे आहे. हे बोलणे आहे एकमेकींना एकमेकींच्या असणाऱ्या आधाराचे, एकमेकींना समजून घेण्याच्या निःशब्द भाषेचे. अव्यक्त दुःखाचे हे निःशब्द बोलणे विलक्षण उत्कट आहे, अन्वर्थक आहे.''त्या मनातल्या मनात बोलत असतील? एंड्रिनविषयी, गळफासाविषयी, विहिरींच्या तळाविषयी, स्वतःच रचलेल्या सरणांविषयी, गोळीबारांविषयी, कर्जांविषयी, सावकारांच्या तगाद्यांविषयी, आत्महत्या केलेल्या आपल्या मुलांविषयी, नवऱ्यांविषयी?'' या दोन प्रश्नांनी समकालीन अस्वस्थ वर्तमानातील गावाच्या, शेतीच्या, शेतकऱ्यांच्या आयुष्याचे अगणित प्रश्न कवेत घेतले आहेत. रक्तपिपासू आणि दमनकारी प्रश्नांची उत्तरे त्या म्हाताऱ्या स्त्रियांसह या वर्तमानाला, या राजकारणाला, या समाजकारणाला मिळालेली नाहीत. समकालीन सांस्कृतिक पर्यावरणाचा एक भागच या कवितेतून व्यक्त झाला आहे. शेतकरी स्त्रियांच्या मनात साकळलेले अव्यक्त दुःख या कवितेच्या ओळीओळीत साकळलेले आहे.




शेतकऱ्यांसह या देशातील सर्वसामान्य माणसांच्या वाट्याला आलेल्या वर्तमानाचा चेहरा ही कविता दाखविते. प्रा. डहाके यांनी सामाजिक, राजकीय, सांस्कृतिक, पर्यावरणाविषयी सूचक भाष्य करणारे काव्यलेखन केले आहे. प्रा. डहाके यांनी अस्तित्ववादाची छाया असणारी आणि वास्तवाचे

**"प्रा. डहाके यांच्या कवितेचे आणखी एक वैशिष्ट्य असे की, ही कविता वाचकाच्या मन आणि मेंदूत विचार निर्माण करते. ही कविता वाचकाला अस्वस्थ करते. ही कविता तिच्यातील व्यक्त अव्यक्त आशयविचारांसह वाचकाच्या मेंदूचा तावा घेते. या कवितेतून वाचकाला त्याची सोडवणूक करताच येत नाही. वाचकाला अस्वस्थ करीत समकालाविषयी गंभीर विचार करायला लावणारी ही कविता आहे. टोकदार असा तीव्र उपरोध या कवितेच्या सुबोध शब्दात ठासून भरलेला अनेकदा आढळतो. सुबोध शब्दांतली तीव्र संवेदनशीलता, आणि नैतिकतेवरची अढळ निष्ठा या कवितेत ठायी ठायी दिसते. वैचारिक पातळीवरच्या क्रांतीची अपेक्षा बाळगणारी ही कविता वाचकाला समाजसन्मुख बनविते."**



प्रखर भान असणारी वैशिष्ट्यपूर्ण अशी कविता लिहिली आहे. आशय, विचार आणि शैली दृष्ट्या वेगळी असणारी प्रा. डहाके यांची कविता मराठी काव्यलेखनाला पृथगात्म असे वळण देणारी आहे. ही कविता समकालीन कवितेपेक्षा सर्वस्वी वेगळी कविता आहे. दरदिवशी अधिकच भयाण होत चाललेल्या वर्तमानाचा, वास्तवाचा वेध ही कविता घेते. या कवितेचे सांस्कृतिक पर्यावरणाशी नाते आहे. संतकविता, प्राचीन साहित्य, आधुनिक साहित्य, विविध भाषांमधील साहित्य, सार्त्र, काम्यू, काफ्का यांची विचारसरणी व साहित्य, संगीत, चित्रपट, शिल्पकला, चित्रकला, लोकसाहित्य, सांस्कृतिक घटना, ग्रामीण जीवन, ग्रामीण वास्तव, प्रसारमाध्यमे, वर्तमानपत्रे व इतर प्रसार माध्यमांद्वारे कळणाऱ्या आणि मनावर परिणाम करणाऱ्या घटना, राजकारण, अर्थकारण, धर्मकारण, कला आणि साहित्याच्या क्षेत्रासह मानवी जीवनातील विविध स्थित्यंतरे, विविध विचारप्रणाली आणि त्यांचे प्रभाव व परिणाम या आणि कितीतरी बाबींशी प्रा. डहाके यांच्या कवितेचे अनुबंध जुळलेले आहेत.

प्रा. डहाके यांच्या कवितेचे एक वैशिष्ट्य असे की, सार्वत्रिक संवेदनशून्यतेचे खिन्न, निरस असे वर्णन करतानाही या कवितेतील विचारांचे आणि भावनांचे कढ प्रचारकी, बेबंद किंवा कृत्रिमही होत नाहीत. उलट हताश, निराश, अगतिक करणाऱ्या सामाजिक-राजकीय घटना घडामोडींच्या पार्श्वभूमीवर वरवर निरस व रूक्ष वाटणाऱ्या या कवितेतील वैचारिकता व भावनात्मकता कमालीची उत्कट बनते, परिणामकारक बनते. राजकारणाचे हिंस्र आणि गलिच्छ रूप, दरदिवशी क्रमाक्रमाने अधिकाधिक हताश होत जाणारे नागरिक, सार्वत्रिक मूल्यऱ्हास यांचे गद्यप्राय शैलीतले कमालीचे सूचक चित्रण करीत वाचकाच्या वैचारिकतेला आवाहन करणे हा प्रा. डहाके यांच्या कवितेचा स्थायीभाव आहे. रूढ काव्यात्मकता टाळूनही ही कविता आपले कवितापण आणि माणसांशी नाते राखून ठेवते. जोपासून ठेवते.

प्रा. डहाके यांच्या कवितेचे आणखी एक वैशिष्ट्य असे की, ही कविता वाचकाच्या मन आणि मेंदूत विचार निर्माण करते. ही कविता वाचकाला अस्वस्थ करते. ही कविता तिच्यातील व्यक्त अव्यक्त आशयविचारांसह वाचकाच्या मेंदूचा तावा घेते. या कवितेतून वाचकाला त्याची सोडवणूक करताच येत नाही. वाचकाला अस्वस्थ करीत समकालाविषयी गंभीर विचार करायला लावणारी ही कविता आहे. टोकदार असा तीव्र उपरोध या कवितेच्या सुबोध शब्दांत ठासून भरलेला अनेकदा आढळतो. सुबोध शब्दांतली तीव्र संवेदनशीलता, आणि नैतिकतेवरची अढळ निष्ठा या कवितेत ठायी ठायी दिसते. वैचारिक पातळीवरच्या क्रांतीची अपेक्षा बाळगणारी ही कविता वाचकाला समाजसन्मुख बनविते. सुबोध शब्दांतून वास्तवाचे दर्शन घडवित माणसांच्या वैचारिकतेला ही कविता आवाहन करते. दृश्यात्मकता हे या कवितेचे एक सामर्थ्य आहे. कॅमेऱ्याने दृश्यं टिपावीत तसे शब्दाशब्दांतून वास्तवाचे दर्शन घडवीत ही कविता माणसांच्या संवेदनशीलतेला-सृजनशीलतेला, वैचारिकतेला साद घालत राहते. माणसांच्या विधायक शक्तींवर या कवितेचा अढळ विश्वास आहे. सभोवतीच्या क्रूर वास्तवाचा बिमोड करण्यासाठी प्रेम, विश्वास, सहकार्य भावना. नैतिकता. सदाचार, संवैधानिक कृतिशीलता, बंधुता, न्याय, समता या बाबींची नितांत आवश्यकता आहे. या विचाराचा पुन्हा पुन्हा उच्चार ही कविता करीत राहते. प्रेमाचे अभंग मूल्यच समकालीन वास्तवात माणसांच्या माणूसपणाचे संवर्धन, संरक्षण करू शकते. माणसांच्या मनातल्या माणुसकीच्या मूल्यजाणिवेला साद घालू शकते, हा विश्वास ही कविता वारंवार व्यक्त करते. सभोवतीचे वास्तव जसे आहे तसे दाखवून माणसाच्या मनातल्या विधायक कृतिशीलतेला











अनुक्रमणिका

प्रत्यक्ष-अप्रत्यक्षपणे साद घालणे हे या कवितेचे सामर्थ्य आहे. या कवितेतली सुटी सुटी वाक्ये आपल्या वैचारिकतेला आवाहन करीत राहतात. शेवटी संपूर्ण कविता तिच्यातील सशक्त आशय विचारांसह एखाद्या अवजड शिळेसारखी आपल्या मन आणि मेंदूवर येऊन बसते. शब्दाशब्दांतून ही कविता माणसांच्या मनात विचार मुरवत राहते. भूमीवर पाण्याचा थेंब थेंब पडत राहावा, वर जलप्रपात दिसू नये; पण जमिनीच्या आत खोलवर जलपातळी वाढत राहावी, तसे या कवितेतील शब्द, ओळी, उच्चार, विचार सामान्य माणसांच्या मनात संथपणे मुरत राहतात; विचारांची-कृतिशीलतेची पातळी आतल्याआत वाढत राहते. माणसांच्या मनातली माणुसकीची अमर्याद शक्ती सभोवतीच्या साऱ्या क्रूर अमानुषतेचा नायनाट करू शकते यावर या कवितेचा विश्वास आहे.

प्रा. डहाके यांच्या कवितेतील प्रतिमा सृष्टी विलक्षण परिणामकारक आणि आशयाच्या वलयांचा विस्तार करणारी आहे. नव्या, आशयपूर्ण आणि वास्तवाचे अंकन करणाऱ्या प्रतिमा या कवितेत सतत येतात. ही प्रतिमासृष्टी दृक्‌प्रत्यय, नादप्रत्यय, स्पर्शसंवेदनेचाही प्रत्यय देणारी आहे. प्रा. डहाके यांच्या कवितांची शैली गेयताप्रधान नाही. मुक्तछंदात लिहिलेल्या या कविता अधिकाधिक गद्यमय होत जातात. गद्यमयशैली असतानाही कवितेचे कवितापण मात्र टिकून राहते, एवढेच नाही, तर ते विलक्षण परिणामकारक बनते. या कवितेची शैली आशयानुगामी आहे. शैलीदृष्ट्याही विचार केला तरी मराठीत लक्षणीय अशी वेगळी कविता म्हणून या कवितेची नोंद करावी लागते.

प्रा. डहाके यांचा कवितेच्या सामर्थ्यावर विश्वास आहे. आपल्या काळाचा, समाजाचा आणि संस्कृतीचा प्रतिनिधी या नात्याने हा कवी समकालीन वास्तवाची जाणीव करून देणारी, विचार करायला प्रवृत्त करणारी कविता लिहितो आहे. ही कविता या शतकातील मराठी साहित्याचा मोलाचा असा दस्तऐवज आहे.

प्रा. डहाके यांच्या काही कवितांतून कमालीचा आशावाद व्यक्त झाला आहे. 'चित्रलिपी' या संग्रहातील 'व्यवहार' ही कविता यासंदर्भात लक्षणीय आहे.

*घराघरांतून नागरिक रस्त्यांवर आलेले आहेत*
*बंदुकीच्या गोळ्यांसारखे*
*त्यामुळे कुठल्या गल्लीत तोंड लपवावे*
*हे दंगलखोरांना कळेनासं झाले आहे.*
*त्यांच्या औटघटकेच्या नेत्यांना*
*काढावी लागताहेत निवेदनं चेहरे झाकायला.*
*बंदोबस्तासाठी आलेल्या सैनिकांची दैना उडाली आहे.*
*छोटी छोटी मुले हातांत फुलांचे गुच्छ घेऊन हिंडताहेत सर्रास*
*मुलांच्या हातात फुले नसून जणू काही बॉम्ब आहेत*
*म्हणून घाबरून गेलेला आहे चिथावणारा जमाव.*
*चौकाचौकात लोक आहेत आणि ते कमालीचे शांत आहेत.*
*त्या शांततेची भीती वाटते आहे*
*राजकीय वर्तुळातील कारवायाखोरांना.*
*आता कुठले फळकूट वाचवील आपल्या बुडत्या पुढारीपणाला*
*म्हणून कासावीस होऊन शोधताहेत ते काडीचा आधार.*
*वरून खिडकीतून खालच्या रस्त्यावर डोकावत अदमास घेताहेत.*
*खालच्या रस्त्यावरची माणसे*
*गरजेच्या गोष्टी घेताहेत, एकमेकांशी बोलताहेत, हसताहेत.*
*वरची माणसे देश मेल्यासारखी सुतकात बसली आहेत.*
*मुले खेळताहेत, खेळताना होणारे त्यांचे मुक्त चीत्कार*
*ऐकू येऊ नये म्हणून कान झाकून घेताहेत हंगामी नेते.*
*शांतपणे चाललेले आहेत सगळे व्यवहार.* (चित्रलिपी, पृ.२९)

विधायक शक्तीनेच विघातक शक्तींवर विजय मिळवता येऊ शकतो. या विचाराचा निर्भयपणे उच्चार ही कविता करते. नैतिक, कृतिशील, विचारांच्या सामर्थ्यावर प्रा. डहाके यांचा विश्वास आहे. माणसांचे सामुदायिक सदाचाराचे नैतिक सामर्थ्य उद्याच्या सुंदर दिवसाची निर्मिती करील हा विश्वास, हा आशावाद प्रा. डहाके यांच्या कवितेचे सौंदर्य आणि सामर्थ्यही आहे. म्हणूनच ही कविता भारतीय साहित्याचा, भारतीय समाज आणि संस्कृतीचा मौल्यवान दस्तऐवज आहे. ●

डॉ. अजय देशपांडे
मराठी भाषा आणि साहित्य विभाग
लोकमान्य टिळक महाविद्यालय
वणी ४४५३०४, जि. यवतमाळ
चलभाष : ९८५०५९३०३०
इ-मेल : deshpandeajay15@gmail.com







लेख

गणेश चौधरी

# 'घोडेगाव' येथील आठवडे बाजारातील सांकेतिक भाषा



**व्यापारी आणि दलाल हे आपल्या दोघांमधील व्यवहार शेतकरी, ग्राहक, इतर व्यापारी ह्यांना समजू नये, म्हणून काही विशिष्ट सांकेतिक भाषा वापरतात. स्थानिक व्यापारी हे गायी, म्हशी आणि इतर जनावरे ह्यांच्या व्यवहारासाठी काही सांकेतिक शब्द, खुणा आणि अक्षरी रुपयांसाठी विशिष्ट सांकेतिक भाषा वापरतात.**

**आठवडे बाजारात होणारे व्यवहार हे ह्या सांकेतिक भाषेच्या, खुणेच्या आणि व्यापारी ग्राहक (शेतकरी, व्यापारी) ह्यांच्या हातावर रुमाल पांघरून रुमालाच्या आतमध्ये (गुप्तपणे) हाताची बोटे पकडून व्यवहार केले जातात.**

**विशिष्ट रकमेसाठी ही सांकेतिक भाषा वापरली जाते आणि ही बोटांची भाषा, विशिष्ट रुपयांसाठी वापरली जाणारी भाषा असते. ती ज्या शेतकऱ्यास किंवा व्यापाऱ्यास समजत नाही किंवा त्यांना व्यवस्थितपणे व्यवहार करण्यास अडथळा येतो, तेव्हा हे शेतकरी बाजारामध्ये असलेले मध्यस्थी (दलाल) ह्यांच्या साहाय्याने व्यवहार घडवून आणतात.**



हमदनगर आणि औरंगाबाद ह्या दोन ऐतिहासिक शहरांना जोडणाऱ्या महामार्गावर अहमदनगरपासून उत्तरेला ३२ कि.मी. अंतरावर घोडेगांव (ता. नेवासा, जिल्हा अहमदनगर) हे गाव वसलेले आहे. घोडेगाव प्रसिद्ध आहे, ते येथे भरणाऱ्या जनावरांच्या आठवडे बाजारामुळे. महामार्गालगत असल्याने वाहतूक आणि दळणवळणाची सुविधा अधिक चांगल्याप्रकारे आहे. शिवाय ग्रामीण भागातील शेतकरी आणि परराज्यांतील शेतकरी, व्यापारी ह्यांनाही अधिक योग्य, चांगली बाजारपेठ घोडेगावने उपलब्ध करून दिली आहे. घोडेगाव येथील आठवडे बाजार म्हशींच्या खरेदी-विक्रीसाठी प्रसिद्ध आहे. आठवडे बाजारामध्ये बहुसंख्य शेतकरी आणि व्यापारी जनावरांची, शेतमालाची, शेतीची अवजारे ह्यांची खरेदी-विक्री करण्यासाठी येतात. येथील आठवडे बाजार हा शुक्रवारी भरतो. आठवडे बाजारासाठी स्थानिक शेतकरी, व्यापारी आणि तालुका जिल्हा आणि परराज्यातूनही शेतकरी, व्यापारी खरेदी-विक्रीसाठी येतात. ह्या खरेदी-विक्रीमुळे लाखो रुपयांची उलाढाल होते. त्यामुळे कृषी उत्पन्न बाजार समिती, सामान्य व्यक्ती, व्यापारी ह्यांना हा आठवडे बाजार उत्पन्नाचे साधन ठरला आहे.

शेतमालाची आणि शेतीसाठी लागणाऱ्या पूरक वस्तूंची खरेदी-विक्री ह्या बाजारात होते. शेतीमालाची आणि इतर वस्तूंची देवाणघेवाण वा विनिमय होण्यासाठी मोठमोठ्या बाजारपेठांबरोबरच आठवडे बाजाराचीही महत्त्वपूर्ण









भूमिका ठरते आहे. उदा. शेतमालावर करावी लागणारी प्रक्रिया, साठवण, वाहतूक, प्रतवारी, जाहिरात, मूल्यनिर्धारण, घाऊक आणि किरकोळ विक्री इ. आठवडे बाजारांमध्येही होतात; परंतु ह्या सर्व प्रक्रिया कार्यक्षमपणे पूर्ण झाल्या, तरच शेतकऱ्यास, त्याच्या शेतमालास योग्य प्रकारे न्याय, भाव मिळू शकेल आणि उपभोक्त्यांनाही दिलेल्या किंमतीच्या मोबदल्यात दर्जेदार माल मिळू शकतो. कृषिमालाची अशा प्रकारची खरेदी-विक्री होण्यासाठी अशा प्रकारचे आठवडे बाजार उपयुक्त आहेत. अशा प्रकारचे आठवडे बाजाराचे महत्त्व थोडक्यात सांगता येईल.

जनावरांच्या खरेदी-विक्रीचा विचार करता परराज्यातून येणारे व्यापारी, गुजरात, हैद्राबाद, आंध्रप्रदेश, इंदौर, ह्या राज्यांमधील व्यापारी हे प्रामुख्याने गायी आणि म्हशींच्या खरेदीसाठी येतात. गावातील स्थानिक व्यापारीही म्हशींच्या खरेदीसाठी गुजरातसारख्या राज्यात जाऊन खरेदी करतात. जनावरांच्या आठवडे बाजाराचे वैशिष्ट्य असे दिसून येते, की व्यवहारामध्ये मध्यस्थी करणाऱ्या दलालाची भूमिका, रुमालाच्या आतमधून हाताच्या बोटाच्या साहाय्याने होणारे व्यवहार आणि महत्त्वपूर्ण म्हणजे व्यापारी-व्यापारी, व्यापारी-दलाल ह्यांमध्ये बोलली जाणारी गुप्त भाषा किंवा सांकेतिक भाषा येथे बोलली जाते. जनावरांच्या खरेदी-विक्रीतून नफा मिळविण्याच्या हेतूने काही व्यक्ती हा व्यवसाय करतात. त्यांनाच आपण व्यापारी म्हणून ओळखतो. व्यापारी-व्यापारी, व्यापारी-शेतकरी, व्यापारी-ग्राहक, शेतकरी- व्यापारी ह्या सर्वांसोबत व्यवहारासाठी मध्यस्थी करणारी व्यक्ती, तिला आपण दलाल म्हणून ओळखतो. दलाली व्यवसाय करणारा असा काही विशिष्ट समाज नाही. ह्या आठवडे बाजारात दलाली करणारे सर्व जाती, धर्माचे लोक असलेले दिसून येतात.

व्यापारी आणि दलाल हे आपल्या दोघांमधील व्यवहार शेतकरी, ग्राहक, इतर व्यापारी ह्यांना समजू नये, म्हणून काही विशिष्ट सांकेतिक भाषा वापरतात. रुमालाखालून ते व्यवहार करतात. आठवडे बाजारामध्ये ग्रामीण भागातील शेतकरी वर्ग अधिक दिसतो. त्या तुलनेत परराज्यातील शेतकरी, व्यापारी आहेत. स्थानिक व्यापारी हे गायी, म्हशी आणि इतर जनावरे ह्यांच्या व्यवहारासाठी काही सांकेतिक शब्द, खुणा आणि अक्षरी रुपयांसाठी विशिष्ट सांकेतिक भाषा वापरतात. ही भाषा व्यापारी, शेतकरी ह्यांच्यादरम्यान व्यवहार होताना वापरली जाते; परंतु ही सांकेतिक भाषा, खुणा ह्या सर्व शेतकरी, ग्राहक, परराज्यातून येणारी शेतकरी, व्यापारी ह्यांना समजतेच, असे नाही. आठवडे बाजारात होणारे व्यवहार हे ह्या सांकेतिक भाषेच्या, खुणेच्या आणि व्यापारी ग्राहक (शेतकरी, व्यापारी) ह्यांच्या हातावर रूमाल पांघरून रुमालाच्या आतमध्ये (गुप्तपणे) हाताची बोटे पकडून व्यवहार केले जातात. ही बोटे पकडणे ज्याला संपूर्णपणे कळतात, तीच व्यक्ती रुमालाच्या साहाय्याने व्यवहार करते. विशिष्ट रकमेसाठी ही सांकेतिक भाषा वापरली जाते आणि ही बोटांची भाषा, विशिष्ट रुपयांसाठी वापरली जाणारी भाषा असते. ती ज्या शेतकऱ्यास किंवा व्यापाऱ्यास समजत नाही किंवा त्यांना व्यवस्थितपणे व्यवहार करण्यास अडथळा येतो, तेव्हा हे शेतकरी बाजारामध्ये असलेले मध्यस्थी (दलाल) ह्यांच्या साहाय्याने व्यवहार घडवून आणतात. हे मध्यस्थी मात्र अशाच शेतकऱ्यांच्या मागावर असतात. कारण त्यांचे उत्पन्न, त्यांना मिळणारा पैसा ह्या शेतकऱ्यांकडून, व्यापारी ह्यांच्याकडून मिळतो.

आठवडे बाजारातील व्यवहार हा 'नजरेचा खेळ' (पारख करण्याची क्षमता) आहे, असे समजले जाते कारण शेतकरी किंवा व्यापारी ह्यांना त्यांना पाहिजे असलेले जनावर किंवा वस्तू अधिक पटते. वस्तूचे महत्त्व, त्यातील खरेखोटेपणा आपल्या नजरेने जाणतो, त्याच वेळेस तो खरेदी करण्यास प्रवृत्त होत असतो. शेतकऱ्यांच्या, जनसामान्यांच्या गरजेच्या ज्या-ज्या काही वस्तू असतील, त्या सर्व ह्या आठवडी बाजारात मिळतात. येथे वापरली जाणारी सांकेतिक भाषा ही मात्र जनावरांच्या बाजारामध्येच वापरली जाते. तिचा भाजीपाला, धान्य-बाजारामध्ये वापर केला जात नाही.

आठवडे बाजारामध्ये विशिष्ट शब्द, विशिष्ट रकमेसाठी सांकेतिक भाषा, रुमालाखालील बोटांच्या हालचाली किंवा बोटांचा वापर कशा प्रकारे केला जातो ह्याविषयी अधिक माहिती देता येईल. ती अशी की, बाजारात विशिष्ट रकमेसाठी जी सांकेतिक भाषा वापरली जाते, तिला 'पारसी' ह्या नावाने ओळखले जाते. ही पारसी काही ठरावीक रकमेपर्यंत वापरली जाते. त्यानंतर मात्र हाताच्या (बोटांच्या) साहाय्याने व्यवहार केले जातात.

'पारसी' पुढील रकमेसाठी वापरली जाते.

| रुपये | पारसी |
|---|---|
| १०० रुपये | शिकारा |





> मात्र ही सांकेतिक भाषा सर्वच आठवडे बाजारात वापरली जात नाही. दुसऱ्या आठवडे बाजारामध्ये ह्याच रकमेसाठी दुसरीही भाषा वापरली जाते. जसे लोणी (ता. राहाता), काष्टी (ता. श्रीगोंदा) ह्या ठिकाणी नेथील आठवडे बाजारातील व्यापारी दुसऱ्या आठवडे बाजारामध्ये खरेदी-विक्रीसाठी गेला, तरी स्थानिक व्यापारी वापरत असलेली सांकेतिक भाषा दुसऱ्या व्यापाऱ्यास समजू देत नाही.

| | |
|---|---|
| २०० रुपये | डुवरा |
| ३०० रुपये | धला |
| ४०० रुपये | 'नाकी', 'गाफा' |
| ५०० रुपये | कप, कपडा |
| ६०० रुपये | सबई |
| ७०० रुपये | रेखी |
| ८०० रुपये | वट्टल |
| ९०० रुपये | उनी |
| १,००० रुपये | ठोकण |
| १,१०० रुपये | एक्कण |
| १,२०० रुपये | जोड आसर |
| १,३०० रुपये | धला आसर |
| १,४०० रुपये | गाफा आसर |
| १,५०० रुपये | गिरीपंजा |
| १,६०० रुपये | गाफा खुराट |
| १,७०० रुपये | धला खुराट |
| १,८०० रुपये | डुबरा खुराट |
| १,९०० रुपये | शिकारा खुराट |
| २,००० रुपये | डुबरा ठोकण |

ह्या सांकेतिक भाषेचा सर्वसामान्यपणे वापर केला जातो; परंतु जनावरांच्या बाजारभावाप्रमाणे किंमती अधिक असतात, तेव्हा ह्या २,००० रुपये पर्यंतच्याच सांकेतिक भाषेचा उपयोग हजाराच्या तुलनेत म्हणजे समोरील वस्तूची किंमत विचारात घेऊन केला जातो. ह्या १,०००/-, २,०००/-, ३,०००/-, ५,०००/-, ६,०००/-, ७,०००/-, ८,०००/-, ९,०००/- रुपयांसाठी वरील १०० ते ९०० रु. पर्यंतच्या भाषेचा वापर केला जातो; तर २०,०००/- रुपयांसाठी 'हत्यार', 'गड्डी' ह्या शब्दांचा विशेषणासारखा उपयोग केला जातो. ह्या पुढील ११,०००/-, १२,०००/-, १३,०००/-, १४,०००/-, १५,०००/-, १६,०००/-, १७,०००/-, १८,०००/-, १९,०००/- रुपयांसाठी १,१००/- ते १,९०० रुपयांपर्यंतच्या सांकेतिक भाषेचाच वापर केला जातो; तर २०,०००/- रुपयांसाठी 'सुती' अशा प्रकारचा संकेत वापरला जातो.

ह्यापुढील

| | |
|---|---|
| २५,०००/- | कपसुती |
| ३०,०००/- | मेटा |
| ४०,०००/- | नाकी ठोकण |
| ५०,०००/- | निमती टोकण किंवा ऐवज टोकण |
| १,००,०००/- | पेटी |

अशा प्रकारे वापरली जाते.

मात्र ही सांकेतिक भाषा सर्वच आठवडे बाजारात वापरली जात नाही. दुसऱ्या आठवडे बाजारामध्ये ह्याच रकमेसाठी दुसरीही भाषा वापरली जाते. जसे लोणी (ता. राहाता), काष्टी (ता. श्रीगोंदा) ह्या ठिकाणी तेथील आठवडे बाजारातील व्यापारी दुसऱ्या आठवडे बाजारामध्ये खरेदी-विक्रीसाठी गेला, तरी स्थानिक व्यापारी वापरत असलेली सांकेतिक भाषा दुसऱ्या व्यापाऱ्यास समजू देत नाही.

आता रुमालाच्या हाताच्या बोटाच्या साहाय्याने जनावराची योग्य ती किंमत ठरवून जे व्यवहार केले जातात. त्याविषयी असे सांगता येईल की, व्यवहार करताना ते इतरांना दिसणार नाहीत, ह्याची प्रथम काळजी घेतली जाते. व्यवहार करताना दोघांनाही (विक्रेता-खरेदीदार) अशा प्रकारच्या व्यवहाराची माहिती हवी. हे दोन अलिखित स्वरूपाचे नियम सांगता येईल.

प्रत्यक्ष व्यवहार करताना शक्यतो उजव्या हाताचाच वापर केला जातो, असे दिसून येते. आपल्या हाताच्या पाचही बोटांचा व्यवहारासाठी वापर केला जातो. अंगठा, तर्जनी, मधले बोट, अनामिका, करंगळी ह्या बोटांच्याच साहाय्याने १,०००/- रुपयांपासून ते १,००,०००/- रुपयांपर्यंतचे, १,००,०००/- रुपयांपासून ते







अनुक्रमणिका

१०,००,०००/- रुपयापर्यंतचे व्यवहार केले जातात. मात्र अशा प्रकारच्या व्यवहारासाठी ग्राहक, व्यापारी ह्यांच्याजवळ त्या वस्तूची किंमत ठरविण्याची क्षमता असायला हवी. आपल्या बोटांचा व्यवहारासाठी अशा प्रकारे उपयोग केला जातो, की हाताच्या तर्जनीचा उपयोग शंभर रुपये, एक हजार रुपये, दहा हजार रुपये, एक लाख रुपये ह्यांसाठी केला जातो. 'तर्जनी' आणि 'मधले बोट' ह्यांचा उपयोग दोनशे रुपये, दोन हजार रुपये, वीस हजार रुपये, दोन लाख रुपये ह्यांसाठी केला जातो. 'तर्जनी', मधले बोट आणि अनामिका ह्यांचा उपयोग तीनशे रुपये, तीस हजार रुपये, तीन लाख रुपये ह्यांसाठी केला जातो. 'तर्जनी', मधले बोट 'अनामिका' आणि 'करंगळी' ह्यांचा उपयोग चारशे रुपये, चार हजार रुपये, चाळीस हजार रुपये, चार लाख रुपये इत्यादीसाठी केला जातो; तर 'तर्जनी', मधले बोट, अनामिका, करंगळी आणि अंगठा ह्यांचा उपयोग पाचशे रुपये, पाच हजार रुपये, पन्नास हजार रुपये, पाच लाख रुपये ह्यांसाठी केला जातो; परंतु ह्याव्यतिरिक्त जी रक्कम असते- जशी की, ३३,०००/-, ५५,०००/-, ३४,०००/- अशा प्रकारच्या रकमेसाठी बोटांचा दोनदा उपयोग केला जातो. अशा प्रकारचे व्यवहार अतिशय गतीने होत असतात. ह्यासाठी त्या गतीच्या बरोबरीने विचारही करता येणे गरजेचे असते. तरच हाताच्या साहाय्याने विक्रेता-ग्राहक ह्यांचा बोटांच्या साहाय्याने सुसंवाद होऊ शकतो. येथे वापरली जाणारी ही सांकेतिक भाषा किंवा गुप्त भाषा (पारसी) ह्यांच्या निर्मितीसंबंधी मात्र समाधानकारक उत्तर देता येत नाही.

व्यवहाराची सुरुवात करताना व्यवहारासाठी बांधील असावे. त्यासाठी एक चलनाची नोट विक्रेता ग्राहकाकडून त्याच्या ताब्यात घेत असतो आणि नंतरच व्यवहारास सुरुवात केली जाते. एकाच वेळेस विक्रेता हा त्याच वस्तूवर, जनावरावर दुसऱ्या ग्राहकाशी व्यवहार करू शकतो. जो ग्राहक अगोदर योग्य किंमत देऊन व्यवहार करेल, त्यास ते जनावर विक्रेता देण्यास तयार होतो. ही तयारी दर्शविण्यासाठी त्याला ग्राहक त्या जनावराच्या पाठीवर थाप मारावयास सांगून विक्रेता थाप मारतो. ज्या वेळेस जनावराच्या पाठीवर थाप मारली जाते, त्याच वेळेस संपूर्ण व्यवहार व्यवस्थित आणि विक्रेता-ग्राहक ह्यांच्या सहमतीने झाला, असे ग्राह्य धरले जाते.

ह्या व्यवहारांमध्ये स्वरूप दोन प्रकारचे असते.

१. रोखीचे किंवा तत्कालिक व्यवहार

२. वायदे व्यवहार

१. रोखीचे किंवा तात्कालिक व्यवहार : ह्या व्यवहारांत प्रत्यक्ष खरेदी-विक्री होऊन विक्रेत्यास त्या वस्तूचा / ज़नावराचा ताबा ताबडतोब द्यावा लागतो आणि ग्राहकाला त्या जनावराचा तावडतोब ताबा घेऊन त्याची रोख किंमत द्यावी लागते. म्हणजेच मालाची खरेदी-विक्री, ताबा आणि किंमत चुकविणे हे व्यवहार एकाच वेळी घडत असतात.

२. वायदे व्यवहार : ह्या व्यवहारांत खरेदी-विक्रीचे व्यवहार त्या वेळच्या चालू बाजारभावाप्रमाणे केल्याचे वायदे केले जातात; पण वस्तूची देव-घेव आणि त्याची किंमत ही वायद्याप्रमाणे ठरलेल्या काळात होते.

अशा प्रकारचे व्यवहाराचे स्वरूप दिसून येते.

आठवडे बाजारामध्ये वापरले जाणारे सांकेतिक शब्द :

आठवडे बाजारामध्ये वापरले जाणारे सांकेतिक शब्द कोणकोणते आहेत, ह्याचाही आपणास विचार करता येईल.

बाजारामध्ये माणसांसाठी, सहमतीसाठी, निघून जाण्यासाठी, थांवण्यासाठी, बोलण्यासाठी, दलालासाठी, किंमत कमी-अधिक करण्यासाठी जे सांकेतिक शब्द वापरले जातात ते पुढीलप्रमाणे :

बाजारामध्ये व्यवहार करताना दोन व्यक्तींची गरज असते. एका व्यक्तीचा उपयोग होत नाही. अशा ह्या 'व्यक्ती'साठी 'मानवा' शब्द वापरला जातो. व्यवहार चालू असताना व्यवहारासाठी मध्यस्थी करणाराही असतो. ज्या ग्राहकास जनावर घ्यायचे आहे; परंतु तो आपली सहमती लवकर दर्शवित नाही, तेव्हा मध्यस्थी करणारा त्या ग्राहकाची संमती दर्शविण्यासाठी त्याला त्या वस्तूविषयी अधिक माहिती देतो. त्याच्याशी चर्चा करतो. त्यानंतर ग्राहक आपली संमती दर्शवितो. ह्याला 'माली करणे' हा शब्दप्रयोग वापरला जातो. मध्यस्थी करणारा (दलाल) ह्यालाही बाजारामध्ये 'न्याहऱ्या' ह्या नावाने ओळखले जाते. हा न्याहऱ्या व्यवहार करण्याच्या आणि घडवून आणून देण्याच्या बदल्यात मात्र ग्राहक-विक्रेता ह्यांच्याकडून काही विशिष्ट रकमेची मागणी करत असतो. ही मागणी सांकेतिक स्वरूपातच केली जाते. बाजारामध्ये दोन व्यक्तींमधील संवाद हे सर्वसामान्यपणे न होता, जर ते जोराने किंवा दरडावून केला असेल; तर इतर व्यक्ती त्यास शांत बसू नको, अशी सूचना करण्यासाठी 'हेंगल' हा शब्द वापरतात. बाजारामध्ये जशी चांगली, तशीच वाईटही

"जनावराच्या व्यवहारानंतर जसे गाय किंवा म्हैस ह्यांच्यासाठी दुधाची, आजारी पडण्याची इ. इतर जनावरांच्याही बाबतीत त्यांचा जो गुणधर्म असेल, त्याची खात्री (गॅरंटी) दिली जात नाही किंवा त्यासाठी बांधील असत नाही. त्यासाठी 'खारी माती' असा शब्द वापरला जातो. हा शब्दप्रयोग व्यवहार झाल्यानंतर बाजार समितीची खरेदी-विक्री केल्याची पावती ज्यावेळेस केली जाते, त्या वेळेस त्या पावतीवर 'खारी माती' असा शब्दप्रयोग विक्रेत्याच्या सहमतीपुढे केलेला असतो. जनावरांच्या डोळ्यांसाठी 'टिपणं' असा शब्द वापरला जातो. डोळा खराब होणे, न दिसणे ह्यासाठी 'टिपणं बस्तर' असा शब्दप्रयोग केला जातो."

माणसे असतात. चांगली किंवा वाईट ह्या अर्थाने की, त्यांना त्या वस्तूची किंमत ठरवता न येणे. एकदा व्यवहार करून पैसा योग्य वायद्यास न देणे. ह्यासाठी 'वस्तर', 'कलुग्या उगद' अशा प्रकारचे शब्द वापरले जातात. काही कारणाने दोन व्यक्तीत विसंवाद होतो. ते अश्लील बोलतात. ह्यासाठी 'लालची देणे' हा शब्दप्रयोग केला जातो. मध्यस्थी करणारा दलाल पैशाची मागणी सांकेतिक स्वरूपात करतो. एक हजार रुपयांसाठी 'एक सिगार' आणि पाचशे रुपयांच्या मागणीसाठी 'एक कप चहा' असे शब्द ह्या दलालाच्या तोंडी दिसून येतात.

व्यवहार सुरू असताना विक्रेता-ग्राहक आणि दलाल ह्यांच्यामध्ये किंमत कमी-अधिक करण्यासाठी 'खुराट करणे' आणि 'बादिक करणे' असा शब्दप्रयोग केला जातो. आपण सर्वसामान्यपणे गायीच्या आणि म्हशीच्या दुधासाठी 'दूध' हाच शब्द वापरतो; परंतु बाजारामध्ये दुधासाठी 'फेसकं' असा शब्द वापरला जातो.

जनावराच्या व्यवहारानंतर जसे गाय किंवा म्हैस ह्यांच्यासाठी दुधाची, आजारी पडण्याची इ. इतर जनावरांच्याही बाबतीत त्यांचा जो गुणधर्म असेल, त्याची खात्री (गॅरंटी) दिली जात नाही किंवा त्यासाठी बांधील असत नाही. त्यासाठी 'खारी माती' असा शब्द वापरला जातो. हा शब्दप्रयोग व्यवहार झाल्यानंतर बाजार समितीची खरेदी-विक्री केल्याची पावती ज्यावेळेस केली जाते, त्या वेळेस त्या पावतीवर 'खारी माती' असा शब्दप्रयोग विक्रेत्याच्या सहमतीपुढे केलेला असतो. जनावरांच्या डोळ्यांसाठी 'टिपणं' असा शब्द वापरला जातो. डोळा खराब होणे, न दिसणे ह्यासाठी 'टिपणं बस्तर' असा शब्दप्रयोग केला जातो. व्यवहार सुरू असताना एखादी व्यक्ती मध्येच काहीतरी गरज नसताना बोलली, तर त्यासाठी 'खोंबाड मारणे' असा शब्दप्रयोग केला जातो. बाजारामध्ये महत्त्वाचे स्थान असलेला ग्राहक (गिऱ्हाईक) ह्यास 'कलुगं' असा शब्द प्रयोग वापरला जातो. ही बाजारातील सांकेतिक भाषा काही शेतकरी समजू शकतात. तेव्हा त्यासाठी 'पारसी आवरणे' असे म्हटले जाते. बाजारातील व्यवहार हे रोखीने, उधारीनेही केले जातात. जो व्यापारी शेतकऱ्यासोबत उधारीने व्यवहार करतो, त्या वेळेस काही ठरावीक दिवसांची पैशाची हमी शेतकरी व्यापाऱ्यास देतो. ह्या ठरावीक दिवसांनंतर व्यापारी शेतकऱ्याकडे पैशाची मागणी करतो. ह्या मागणीसाठी 'तगादा लावणे', 'तगादा गोळा करणे' असे म्हटले जाते. एखाद्या व्यक्तीला निघून जा, असे सांगण्यासाठी 'उकस' हा शब्द वापरला जातो, तर थांबवून ठेवण्यासाठी 'थंग' हा शब्द वापरला जातो. असे अनेक प्रकारचे शब्द वापरले जातात.

●

(टीप : वरील माहितीचे आणि शब्दांचे संकलन करण्यासाठी मला आठवडे बाजारातील व्यापारी, दलाल, शेतकरी आणि इतर व्यक्तींचे सहकार्य लाभले. मी मुलाखतीच्या माध्यमाने ही माहिती संकलित केलेली असून मुलाखतीद्वारे माहिती देणाऱ्या व्यक्तींमध्ये श्री. अमर हसनाळे (रा. जेऊन बा. ता. जि. अहमदनगर), अर्जुन शेंगडे, विजय भडके, हरिभाऊ गवळी (रा. घोडेगाव, ता. नेवासा, जिल्हा अहमदनगर) आदींकडून मी माहिती घेण्याचा प्रयत्न केलेला आहे. ह्याबरोबरच घरातील वडीलबंधू श्री. आबासाहेब चौधरी, ज्ञानदेव चौधरी हे आठवडे बाजारामध्ये जनावरांच्या खरेदी-विक्रीसाठी जातात, त्यांच्याकडूनही माहिती घेतली असून रुमालाखालून होणाऱ्या व्यवहारांची भाषा मी समजून घेतली आहे.)

**प्रा. गणेश चौधरी**
मराठी विभाग, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ,
पुणे ४११ ००७.
चलभाष : ९४०३७७१५२०



समीक्षा

रामचंद्र काळुंखे

## 'मराठी कादंबरी : आशय आणि आविष्कार'

# समकालीन कादंबरीचे मर्मग्राही विश्लेषण


राठी साहित्य अनेक अंगांनी बहरत असताना कादंबरीलेखन मात्र तुलनेने कमीच होताना दिसते. लिहिण्यासाठी अधिकचा वेळ लागत असल्याने संख्यात्मक वाढ होताना दिसत नसली तरी अत्यंत चांगल्या कादंबऱ्या या काळात लिहिल्या जात आहेत. मात्र कादंबरीचा हा वाचक चरित्रात्मक आणि अनुभवपर साहित्याकडे वळताना दिसतो. अशा वेळी चांगल्या कादंबऱ्या वाचकांपर्यंत पोहोचणे गरजेचे ठरते; परंतु दुसरीकडे त्यासाठीची कादंबरीसमीक्षा अल्प प्रमाणातच होताना आढळते. तशा अपेक्षा कराव्यात असे तरुण साहित्याभ्यासक-समीक्षक तुलनेने कमीच आहेत. दत्ता घोलप हे त्यांतल्या अग्रभागी असलेल्या तरुणांतील एक महत्त्वाचे अभ्यासक म्हणून परिचित आहेत. 'मराठी कादंबरी : आशय आणि आविष्कार' हे त्यांचे देखणे आणि भरीव असे पुस्तक बाळासाहेब घोंगडे यांच्या अक्षरवाङ्मय प्रकाशनाने नुकतेच प्रकाशित केले. हातात घेतल्याबरोबरच त्याकडे बघण्याचा गंभीर दृष्टिकोन गणेश विसपुते यांनी केलेल्या मुखपृष्ठामुळे तयार होतो. या पुस्तकातील एकूण चौदा लेखांपैकी पहिले सहा लेख हे मराठी कादंबरीचे संस्कृतीच्या अंगाने केलेले विश्लेषण आहे. 'स्वातंत्र्यपूर्व काळातील ग्रामीण कादंबरी'वरचा एक लेख सोडला, तर समकालीन कादंबरीबद्दलचे हे आकलन पुस्तकाच्या शीर्षकाप्रमाणे आशयाचा आणि आविष्काराचा विचार करणारे आहे. 'नव्वदनंतरच्या कादंबरीतील प्रयोगशीलता', 'कादंबरीचे रचित', 'नेमाडे यांच्या कादंबऱ्यांचे आविष्कारविशेष' असे काही महत्त्वाचे लेख त्यात नोंदवता येतील, तर उर्वरित आठ लेख हे कादंबऱ्यांचे परीक्षणवजा असले तरीही ते तितकेच महत्त्वाचे आहेत.

'आजची मराठी कादंबरी : सांस्कृतिक परिप्रेक्ष्य' हा लेख या संग्रहाचा बीजभूत म्हणावा असा लेख आहे. वास्तववादी, देशीवादी, ऐतिहासिक, स्त्रीवादी, रंजनवादी या प्रवाहाच्या अंगाने कादंबरीचा विचार करून हे विवेचन केले आहे. कादंबरीचा विचार हा समाजाला वगळून होऊ शकत नाही, तसाच काळाला वगळून करता येत नाही. आज जागतिकीकरणाने बदललेल्या काळाने आपले वास्तवाचे संदर्भ बदलले. कादंबरी संरचनेवर त्याचा कोणता आणि कसा परिणाम झाला याचा संस्कृतीच्या अंगाने त्यांनी ऊहापोह केला आहे. या ग्रंथात वास्तववादी कादंबऱ्यांची चर्चा अधिक प्रमाणात येते; पण तिच्या सरधोपटपणाकडे मात्र ते दुर्लक्ष करीत नाही. कादंबरीला कलात्मक रूप देण्यात असे लेखक कमी पडतात. नव्वदोत्तर काळाची व्यामिश्रता या लेखकांची दमछाक करताना दिसते. घोलप यांचे हे निरीक्षण वेधक आणि महत्त्वपूर्ण आहे.




- मराठी कादंबरी : आशय आणि आविष्कार
- दत्ता घोलप
- अक्षरवाङ्मय प्रकाशन, पुणे
- पृष्ठे १६२
- किंमत : २००/- रुपये



अनुक्रमणिका



**'१९९० नंतरच्या मराठी कादंबरीतील प्रयोगशीलता' या लेखात कादंबरीत प्रयोगशीलता का आणि कशाप्रकारे येत गेली याचे विश्लेषण आहे. आशयाच्या मागणीतून आविष्काराच्या रीती घडत असतात. कादंबरीचा रूपबंध बदलतो कारण वर्तमान वास्तवाशी असलेल्या संबंधातून कादंबरीच्या संरचनेवर खोलवर परिणाम होत असतात. कथनाचे विविध प्रयोग करणारी कादंबरी घोलप यांच्या दृष्टीने महत्त्वाची ठरते. श्याम मनोहर, मकरंद साठे, रंगनाथ पठारे, दीनानाथ मनोहर, भालचंद्र नेमाडे, राजन गवस, प्रवीण बांदेकर, अवधूत डोंगरे, रमेश इंगळे-उत्रादकर तसेच आनंद विनायक जातेगावकर यांच्या कादंबऱ्यांची श्रेष्ठता घोलप यांनी सकारण मांडली. रूपदृष्ट्या सजग असणारी कादंबरी गुणात्मकतेत अव्वल ठरली आहे, हे प्रतिपादन ठळकपणाने येते.**



उपलब्ध ऐतिहासिक कादंबरी लक्षात घेऊन नेमाडे यांनी ती निकालात काढली होती. घोलप यांच्यापुढे असलेली नव्वदनंतरची कादंबरी आधीच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांच्या कितीतरी पुढे गेलेली आहे. मराठीतील लोकप्रिय ऐतिहासिक कादंबरीला छेद देण्याचे काम या काळात 'अंताजीची बखर', 'मन्वंतर', 'रुद्र', 'अस्वस्थ वर्तमान' या कादंबऱ्यांनी केले. समकालातले वास्तव, काळ लक्षात घेऊन या कादंबऱ्यांचे सोदाहरण विश्लेषण येथे आढळते.

'१९९० नंतरच्या मराठी कादंबरीतील प्रयोगशीलता' या लेखात कादंबरीत प्रयोगशीलता का आणि कशाप्रकारे येत गेली याचे विश्लेषण आहे. आशयाच्या मागणीतून आविष्काराच्या रीती घडत असतात. कादंबरीचा रूपबंध बदलतो कारण वर्तमान वास्तवाशी असलेल्या संबंधातून कादंबरीच्या संरचनेवर खोलवर परिणाम होत असतात. कथनाने विविध प्रयोग करणारी कादंबरी घोलप यांच्या दृष्टीने महत्त्वाची ठरते. श्याम मनोहर, मकरंद साठे, रंगनाथ पठारे, दीनानाथ मनोहर, भालचंद्र नेमाडे, राजन गवस, प्रवीण बांदेकर, अवधूत डोंगरे, रमेश इंगळे-उत्रादकर तसेच आनंद विनायक जातेगावकर यांच्या कादंबऱ्यांची श्रेष्ठता घोलप यांनी सकारण मांडली. रूपदृष्ट्या सजग असणारी कादंबरी गुणात्मकतेत अव्वल ठरली आहे, हे प्रतिपादन ठळकपणाने येते. या काळातील प्रयोगशील कादंबरी सांगण्याचे अनेक प्रयोग करते; पण भाषावापराबाबत तेवढी सजग राहत नाही, हा निष्कर्षही तितकाच महत्त्वाचा ठरतो.

गेल्या पन्नास वर्षांतील कादंबरीविचारात भालचंद्र नेमाडे केंद्रवर्ती राहिलेले आहेत. त्यांच्या विचारांमुळे गंभीर कादंबरी मुख्य प्रवाहात समाविष्ट झाली आहे, हे मान्यच करावे लागते. मानवी जीवनाच्या समग्र आकलनाची अपेक्षा करणाऱ्या नेमाडे यांच्या कादंबऱ्यांत वास्तवासोबतच व्यवस्थेची कारणमीमांसा करणारे परिपूर्ण आकलन असते. नेमाडे यांचे अनुकरण करणारी, त्यांचा प्रभाव असणारी आणि समांतर जाणारी कादंबरी या काळात लिहिली जात आहे. 'नेमाडे प्रभावातील मराठी कादंबरी' या लेखात हा प्रभाव शोधला आहे. महानगरीय संवेदनशीलतेवरही भालचंद्र नेमाडेंच्या भूमिकेचा परिणाम झालेला दिसून येतो. कसा आणि कोणता प्रभाव झालेला आहे हे शोधताना नेमाडे यांनी मांडलेल्या देशीवाद, नवनैतिकता आणि वास्तववाद या संकल्पना घोलप यांनी समजावून घेतल्या आहेत. घोलप यांच्या समीक्षालेखनात 'नेमाडे यांच्या कादंबरी आविष्कारा'विषयीचा लेखही काही नवे मांडणारा आहे. निवेदन, कथन आणि आविष्कार यांद्वारे कलेतला भाषेचा सर्जक वापर ते लक्षात आणून देतात.

या ग्रंथात काही परीक्षणे आहेत. चर्चाविश्वात राहिलेल्या समकालातल्या महत्त्वाच्या कादंबऱ्यांचे हे विश्लेषण आहे. 'हिंदू : जगण्याची समृद्ध अडगळ' (भालचंद्र नेमाडे), 'कबीरा खडा बाजार में' (दीनानाथ मनोहर), 'उजव्या सोंडेच्या बाहुल्या' (दशरथ बांदेकर), 'आगळ' (महेंद्र कदम), 'इन्किलाब विरुद्ध जिहाद' (लक्ष्मीकांत देशमुख), 'वारकुल्या वारकुल्या ष्टोऱ्या' (प्रसाद कुमठेकर) तसेच 'चारीमेरा' (सदानंद देशमुख) या परीक्षणांमधून कादंबरीकडे काहीएक सूत्र घेऊन- भूमिका घेऊन तिचे मूल्यमापन करण्याचा प्रयत्न दत्ता घोलप करतात. आशयाबरोबरच कथनव्यवस्थाही त्यांच्या विवेचनाचा भाग होते. सुलभ अशी वर्तमानपत्री ओळख ते करून देत नाही, तर त्या कादंबरीचा भोवताल, लेखनसंदर्भ त्याला असतात. वाचताना कादंबऱ्या वाचण्याची उत्सुकता त्यांच्या विवेचनाने निर्माण होते. मराठीतल्या क्षमता असणाऱ्या नव्या लेखकांबद्दलही लिहिले आहे. प्रवीण दशरथ बांदेकर, जी. के. ऐनापुरे, रमेश इंगळे उत्रादकर, विश्राम गुप्ते या परिचित कादंबरीकारांबरोबरच महेंद्र कदम, शिल्पा कांबळे, अवधूत डोंगरे, सुशील धसकटे, श्रीरंजन आवटे, प्रसाद कुमठेकर या नव्या कादंबरीकारांकडून त्यांनी








केलेली अपेक्षा रास्त म्हणावी लागेल.

आशयाच्या अंगाने जाणाऱ्या कादंबरीसमीक्षेत बऱ्याचदा कादंबरीचा आशयच आपल्या भाषेत सांगितला जातो, तर संरचनेच्या अंगाने जाणारे समीक्षालेखन हे आशयापासून दूर जाते. मात्र आशय आणि आविष्कारातील हे अभिन्नत्व ध्यानात घेत प्रयोगशीलतेकडेही घोलप समाजसंबद्ध तसेच आशयनिष्ठ दृष्टीने पाहतात. कादंबरीत आलेला आशयविषय, पात्रांची रचना, निवेदनव्यवस्था, भाषेचा उपयोग यांच्या अंगाने ही कादंबरी नेमके कोणते विधान करते, यावर भर देतात. लेखकानेच ठरविलेल्या उद्दिष्टांकडे कादंबरी कसा प्रवास करते किंवा तिला कुठे अपयश येते हे मांडतात. त्यासाठी लेखकाची भूमिका आणि संवेदनस्वभाव लक्षात घेतला जातो.

घोलप यांनी एकूण मांडणीवर नेमाडे यांचा असलेला प्रभाव लपवून ठेवलेला नाही. असे असले तरी त्यांच्या विचारांना ते पूर्णतः अनुसरत नाही, तर स्वतःच्या दिशेने जातात. त्यामुळेच नेमाडे यांच्या प्रभावाने लिहिल्या गेलेल्या कादंबऱ्यांच्या मर्यादा दाखवून देत समाजवास्तवाचे भरताड भरून निर्माण झालेल्या वास्तववादी कादंबरीला नाकारतात. जीवनाच्या समग्रतेचा आणि साहित्याच्या कलात्मकतेचा समन्वय त्यांना अपेक्षित आहे. त्यामुळे साहित्य आणि समाज यांच्यातील संबंधाचा विचार प्राधान्याने येतो. समाज, समकालीन समस्या, संस्कृती, भाषा यांच्याशी कादंबरीचे नाते इतर वाङ्मयप्रकारांपेक्षा अधिक जवळचे असते. ते त्यांनी ध्यानात घेतले आहे. संस्कृती अभ्यास हा मूल्यमापनाचा नवा नसला तरी त्यांच्या विवेचनाचा निकष अधिक ठळकपणे पुढे आलेला आहे. त्यांचे हे लेखन विश्लेषणाकडून मूल्यमापनाकडे जात भल्याबुऱ्या बाबी नोंदवत कादंबऱ्यांची इयत्ता ठरवते. या संदर्भात त्यांनी मांडलेली निरीक्षणे मर्मज्ञ स्वरूपाची आहेत. समीक्षेचे असले तरी वाचनीय झालेले हे पुस्तक त्यांना कादंबरीसमीक्षक म्हणून नक्कीच ओळख निर्माण करून देईल.

●

**रामचंद्र काळुंखे**
कला, वाणिज्य आणि विज्ञान महाविद्यालय,
कन्नड,
जि. औरंगाबाद ४३११०३
चलभाष : ७०२००५६४६७ / ९४२३६८८४२५
इ-मेल : ramdaigaonkar@yahoo.com





अनुक्रमणिका









समीक्षा

अश्विनी धोंगडे

# अन्यायालयातील न्यायालयात एक भावोत्कट कविता संग्रह



सुहासिनी इर्लेकर बीड येथील बलभीम महाविद्यालयात पदव्युत्तर मराठी विभाग प्रमुख म्हणून कार्यरत होत्या. मराठी स्त्री संत कवींच्या काव्याचा त्यांनी सामाजिक अंगाने विशेष अभ्यास केला होता. एकूणच संतांचे साहित्य हा त्यांचा विशेष जिव्हाळ्याचा विषय होता आणि त्यावर त्यांनी स्वतंत्रपणे २० पुस्तके लिहिली व आठ पुस्तके संपादित केली. हे नमूद करण्याचे कारण म्हणजे संतांच्या आध्यात्मिक वृत्तीची मोठी छाप त्यांच्या कवितालेखनावर आहे.
मोठी ग्रंथसंपदा त्यांच्या नावावर असली तरी कवी म्हणूनच त्या विशेष ख्यात आहेत. त्यांच्या गद्य लेखनावरही एका काव्यात्म वृत्तीची छाप दिसून येते.

■ ■



कविता हे कवीचे भावचरित्र असते असे म्हटले जाते. 'अन्यायालयातील न्यायालयात' हा डॉ. सुहासिनी इर्लेकर यांच्या निवडक कवितांचा संग्रह वरील उक्तीप्रमाणे सुहासिनीबाईंच्या जीवनपटाचे एक धावते प्रातिनिधिक चित्रण आहे. १९३२साली जन्मलेल्या सुहासिनींनी वयाच्या ७८ वर्षानंतर २०१०मध्ये आपली जीवनयात्रा संपवली. त्यांच्या कन्या डॉ. अलका चिडगोपकर यांनी वडील ॲड. यशवंत इर्लेकर यांच्या इच्छेनुसार आपल्या आईच्या ११-काव्यसंग्रहातील १०० कविता निवडून हा संग्रह संपादित केला आहे. हजारभर कवितांतून नेमक्या १०० कविता निवडून काढणे हे सोपे काम निश्चितच नव्हते; पण कवी म्हणून सुहासिनींच्या स्थायी भावाचे नेमके दर्शन नव्या पिढीला घडावे हा दृष्टिकोन समोर ठेवून त्यांनी कविता निवडल्या आहेत, आणि आठ विभागात त्यांचे सुसूत्र वर्गीकरणही केले आहे. त्यामुळे वाचकाला कवी म्हणून त्यांचे विविध पैलू समजावून घेणे सोपे होते.

सुहासिनी इर्लेकर बीड येथील बलभीम महाविद्यालयात पदव्युत्तर मराठी विभाग प्रमुख म्हणून कार्यरत होत्या. मराठी स्त्री संत कवींच्या काव्याचा त्यांनी सामाजिक अंगाने विशेष अभ्यास केला होता. एकूणच संतांचे साहित्य हा त्यांचा विशेष जिव्हाळ्याचा विषय होता आणि त्यावर त्यांनी स्वतंत्रपणे २० पुस्तके लिहिली व आठ पुस्तके संपादित केली. हे नमूद करण्याचे कारण म्हणजे संतांच्या आध्यात्मिक वृत्तीची मोठी छाप त्यांच्या कवितालेखनावर आहे.

मोठी ग्रंथसंपदा त्यांच्या नावावर असली तरी कवी म्हणूनच त्या विशेष ख्यात आहेत. त्यांच्या गद्य लेखनावरही एका काव्यात्म वृत्तीची छाप दिसून येते. त्यांच्या कन्येने याचे बरोबर वर्णन केले आहे.

''सुहासिनी इर्लेकर या अवघे जीवन काव्यात्म वृत्तीनेच जगल्या. त्यामुळे त्यांचे संपूर्ण प्रवाही भावजीवन हीच एक कविता होऊन गेली होती. कविता जगणे वा कविता करणे या दोनच त्यांच्या मनोवस्था होत्या. अशा भावोत्कट वृत्तीनेच त्या सतत जीवनात वावरत होत्या.''

एखाद्या स्त्रीला अशी काव्यवृत्ती आयुष्यभर जगायला मिळणे ही खरेच भाग्याची गोष्ट आहे. त्यामुळेच त्यांच्या कवितेत कोठे संघर्षाची ठिणगी वा कटू वास्तवाचे अनुभव येत नाहीत, ही एक उल्लेखनीय गोष्ट आहे. कवितेवर त्या मनापासून प्रेम करतात. कविता जगताना कविताच होतात. त्यांच्याच भाषेत 'लक्ष जन्म घेतल्यावर असे मन लाभते' आणि 'लक्ष वादळे सहन केल्यावर असा क्षण येतो.' कवितेतूनच त्या कवितेला आवेगिनी होऊन येण्याचे आणि







अनुक्रमणिका

श्वासातून, प्राणातून गाण्याचे आवाहन करतात. कविता ही त्यांच्यासाठी आतून गारवा देणारी सनातन दंतकथा आहे. अक्षरवाटा त्यांचे अधांतराशी नाते जोडतात. मेजावर पडलेल्या एका छोट्याशा सूर्यकिरणातही त्यांना कविता दिसते. 'अक्षरांनीच आतात बंदिवान करून सादर केलंय मला त्याच्यापुढे' अशा ओळींतून विश्वातील चैतन्याच्या साक्षात्काराने आलेला आध्यात्मिक अनुभव शब्दांतून पकडण्याचा प्रयत्न दिसतो.

गेल्या पिढीच्या प्रातिनिधिक कवी इंदिरा, संजीवनी, पद्मा यांच्या थोड्या समकालीन (पहिला कवितासंग्रह - तृप्ती १९६१) आणि त्यानंतर सुहासिनींवर पहिल्या पिढीचे जसे संस्कार आहेत, त्याचप्रमाणे बदलत गेलेल्या सामाजिक परिस्थितीचे आणि पुढच्या पिढीच्या कवितेचेही संस्कार आहेत. त्यांच्या कवितां लेखनाच्या प्रदीर्घ कालखंडामध्ये त्यांची कविता त्यांच्या व्यक्तित्वाप्रमाणे अधिक परिपक्व होत जाताना दिसते. हे कवी म्हणून त्यांचे मोठेच यश आहे.

कविता लिहिण्यासाठी केवळ प्रतिभा आणि शब्दांची हुकमत पुरेशी नसते. कवीचे शिक्षण, वाचन, कौटुंबिक नातेसंबंध, भोवतालचे सामाजिक पर्यावरण, आकलनक्षमता इत्यादी अनेक आशयद्रव्यातून कवीचे व्यक्तिमत्त्व घडत जाते आणि त्यातून त्याचा जीवनाकडे बघण्याचा एक दृष्टिकोन तयार होतो आणि या जीवनदृष्टीचे प्रतिबिंब कवितेशी कवी प्रामाणिक असेल, तर त्याच्या कवितेत आपोआप पडते, म्हणून कवीचे व्यक्तित्व व त्याची कविता यात अभिन्नत्व असते. सुहासिनींच्या कवितेकडून त्यांच्या व्यक्तित्वाकडे जाता येईल इतक्या त्यांच्या कविता पारदर्शी आहेत. या संग्रहातल्या त्यांच्या १०० कवितांमधून त्यांच्या काव्यात्मक व्यक्तित्वाचे साधारण तीन टप्पे सांगता येतील. पहिल्या टप्प्यात ज्याला 'रोमँटिक पोएट्री' म्हणता येईल अशा कविता आहेत. हा इंग्रजी शब्दसमुच्चय मी जाणीवपूर्वक वापरत आहे. रोमँटिक या शब्दाला मराठीत चपखल बसणारा शब्द नाही, आणि हा शब्द अनेकदा प्रेम या शब्दाशी जोडला जातो. १८९८मधे लिरिकल बॅलडस् आणि त्याला वर्डस्वर्थने स्वतःच लिहिलेली प्रस्तावना प्रसिद्ध करून त्याने रोमँटिक कवितेची पायाभरणी केली आणि त्यानंतर रोमँटिक कवितेचा एक स्वतंत्र पंथ निर्माण झाला. मराठीत साधारणपणे रविकिरण मंडळातील कवींपासून अशा लेखनाला सुरुवात झाली, आणि अशाप्रकारची कविता अत्यंत लोकप्रिय झाली. अजूनही हा 'रोमँटिसिझम' उतरलेला नाही. मराठी कवितेची एक फांदी अजूनही अशा कविता लिहिते आहे. अशा कविता लिहिणे हा एक कवीच्या वृत्तीचा भाग आहे, आणि त्यात कुठल्याही प्रकारच्या उणेपणाचा अर्थ अभिप्रेत नाही.

भावनिकता, शारीरसंवेदनशीलता, प्रेमभावना, प्रफुल्लित चित्तवृत्ती, आदर्शव्यक्तीपूजन, भूतकाळाचे स्मरणरंजन, स्वातंत्र्याची ओढ, देशप्रेम, जीवनाची ओढ, इहवादी जीवनातील शोषण आणि कुरूपता याबद्दल राग, सामान्य व्यक्तीबद्दल सहानुभूती ही साधारणपणे रोमँटिक कवितेची लक्षणे आहेत. व्यक्तिगतता, गेयता, शैलीसुलभता, कल्पनेचा प्रतिभाविलास यातून अशी कविता उमलत जाते. अशा कवितांमधून जीवनाबद्दलचा एक निरामय आनंद स्रवत असतो. कवीने घेतलेली ही आनंदानुभूती चांगली कविता वाचकांपर्यंत पोचवते. सुहासिनींच्या अनेक कविता या कसोटीला उतरणाऱ्या आहेत.

या टप्प्यावरच्या कवितांत मोठा भाग प्रेमकवितांचा आहे. इंदिरा, पद्मा, संजीवनी यांच्या समकालातील ही कविता आहे. या कवितेतील प्रेयसी 'मनकळीच्या पाकळ्या' उमलवत प्रियकरासोबत कुठेही जायला तयार आहे. ती ओलेती कमळणवेल आहे, चंद्र सूर्य तारे ओटीत घेऊन आली आहे, सागराची गाज होऊन सख्याला हाकारणारी आहे.

*उधळीन बकुळफुले अलुसर ये*
*पदचिन्हे मम अवलोकीत ये*
*पढवीन वल्लरींना पूशित ये*
*छुमछुम छननन छुम छननन*
*संकेत रे ही ऽ*
*नुपुरेच*
*ये तिथेच*... (संकेत)

तारुण्यातील प्रेमसुलभ भावना, क्षणात लटका राग, क्षणात ओढ, मीलनाची आस, विरहातील आर्तता असे सगळे भावभावनांचे प्रीतिरंग त्यांच्या कवितेत सचैल न्हाऊन येतात. प्रेमकवितांचे आणि निसर्गप्रेमाचे नाते फार जवळचे असते. त्यांच्या प्रेमकवितांमध्ये निसर्गातील प्रतिमांची रेलचेल आहे. किंबहुना या प्रतिमांमधूनच प्रेमभावना आकारत राहते. रुसव्यातला धुंद निशिगंध, डोळ्यांतले मोर, नभाच्या पानापानातली निळीजांभळी नक्षी, मेंदीत रंगलेला, खुळा पक्षी, (प्रियकर), आसू गाळणारे श्रावणी आभाळडोळे, पाकळ्यांच्या ओठांनी गायलेले गाणे, स्पर्शकमळे, डोळ्यात झुरणारा सारंग वगैरे प्रतिमा निसर्गातून उमललेल्या असल्याने प्रेमाला गहिरी डूब देतात. मधाळी सांजभेटी, कर्पूरी तनू, देहधुनाची झांज, स्पंदनांची धुमाळी,



अनुक्रमणिका

अक्षरांची दिवाळी वगैरे उपमा, रूपके या कवितांची 'रोमँटिक्' वृत्ती पुरेशी व्यक्त करणारे आहेत.

निखळ निसर्गप्रेमाच्या कविताही याच आनंदवृत्तीतून उतरल्या आहेत. 'श्रावणी आभाळ' कवेत घेताना 'कवितांचे मळे' फुलतात. 'प्रतिमांचे घोसच्याघोस झाडांवर झुलत' राहतात. संस्कृतीतल्या आर्ष प्रतिमांमध्ये रमण्याचा छंद याच कवितेत असा व्यक्त होतो.

*प्रत्येक आभा मोरपंखी*
*प्रत्येक नदी निळीसावळी*
*प्रत्येक झाड कदंबवृक्ष*
*प्रत्येक वन वृंदावन*
*प्रत्येक रूपडं कृष्ण कृष्ण*
*प्रत्येक गोपी राधागौळण*
*विश्व अवघं करून सावळं*
*श्रावणी आभाळ नामानिराळं* (श्रावणी आभाळ)

रात्रीच्या काळोखातला शांत निसर्ग, कोसळणाऱ्या मेघांमधला अनावृत्त निसर्ग, फुलांच्या दिवसांत झोक्यावाचून झुलणारा निसर्ग, पावसासाठी आसुसलेला उजाड मातीचा निसर्ग आणि निसर्गाच्या प्रत्येक विभ्रमांशी एकरूप झालेले संवेदनशील मन, निसर्गाची, अनेकविध रूपे आणि मूड्स यांना शब्दांच्या पैंजणात बांधून घेणारी ही कविता वाचताना निरामय आनंदाचा साक्षात्कार देणारी आहे.

शोषित, दरिद्री समाजाबद्दलची सहानुभूती हादेखील एक रोमँटिक गुणविशेष आहे. 'रूपांतर, वस्ती, अंधारस्तोत्र, किल्लारी परिसरात झालेल्या भूकंपावरची कविता ३० सप्टेंबर १९९३, अशा कवितांमधून समाजातील नाहीरे वर्गाबद्दलची सुहासिनींची कळकळ दिसून येते. याचाच एक भाग म्हणजे समाजातील स्वार्थी, ढोंगी लोकनेत्यांवर उपरोधपूर्ण टीका.

*कोंबड्या झुंजवाव्यात तसे त्यांनी पुतळे झुंजवले*
*ओरबाडिले परस्परास नि रक्तबंबाळ करविले*

पुतळ्यांची अशी जातवार वाटणी पाहून पुतळ्यांनीच आपले देह विसर्जित केले. मग स्वतःलाच महात्मा म्हणवून घेणाऱ्यांनीच आपल्याला पुतळ्यांच्या जागी उभे केले. कोणत्याही प्रकारची थेट टीका न करता समाजातील संवेदनशील व्यक्तीला या व्यवस्थेबद्दल वाटणारी चीड 'महानगर' या कवितेमधून प्रभावीपणे व्यक्त होते. 'स्वातंत्र्यदिन नावाचं एक श्रावणव्रत' या कवितेतही स्वातंत्र्यदिनाचं सर्व औचित्य विसरून माणसं कशी निर्बुद्धपणे या दिवसाचा एक सणसमारंभ करून टाकतात, याचं पूर्ण उपरोधिक चित्रण येतं. कहाणीतील व्रताच्या रूपात

**शोषित, दरिद्री समाजाबद्दलची सहानुभूती हादेखील एक रोमँटिक गुणविशेष आहे. 'रूपांतर, वस्ती, अंधारस्तोत्र, किल्लारी परिसरात झालेल्या भूकंपावरची कविता ३० सप्टेंबर १९९३, अशा कवितांमधून समाजातील नाहीरे वर्गाबद्दलची सुहासिनींची कळकळ दिसून येते. याचाच एक भाग म्हणजे समाजातील स्वार्थी, ढोंगी लोकनेत्यांवर उपरोधपूर्ण टीका. कोंबड्या झुंजवाव्यात तसे त्यांनी पुतळे झुंजवले ओरबाडिले परस्परास नि रक्तबंबाळ करविले पुतळ्यांची अशी जातवार वाटणी पाहून पुतळ्यांनीच आपले देह विसर्जित केले. मग स्वतःलाच महात्मा म्हणवून घेणाऱ्यांनीच आपल्याला पुतळ्यांच्या जागी उभे केले.**

प्रकट झालेली ही कविता जितकी बोचरी आहे, तितकीच 'अथातो कळपजिज्ञासा' ही कविता कळप संस्कृतीवर धारदार कोरडे ओढणारी आहे. स्वतःच्या व्यक्तित्वाचे कंगोरे खरवडून काढत, स्वतःला निर्बुद्ध लाचार बनवत, आत्मसमर्पण करणाऱ्या माणसांचे मुखवटे चढवत कळपात शिरून कळपशाही बळकट करण्याच्या प्रवृत्तीवर ही कविता उपरोधाचे धारदार शस्त्र चालवते. आदर्शवादाची पूजा करणाऱ्या रोमँटिक वृत्तीतून विनोबा भावे व सानेगुरुजींवरच्या कविता निर्माण झाल्या आहेत. मी भारतीय आहे, महाराष्ट्रगीत, माझ्या मराठीची बोल, सत्यअहिंसा विजयी भूवर अशा देशभक्तीच्या कवितांमध्ये रचलेपणा जास्त आणि उत्स्फूर्तता कमी पडते असे वाटते. अशा कवितांचा एक साचा बनलेला आहे, आणि या कविता त्याच साच्यातल्या आहेत.

मात्र, या 'इझम'मध्ये सुहासिनी अडकून पडल्या नाहीत, हा त्यांचा कवी म्हणून विशेष. या पुढच्या टप्प्यावरच्या कविता बहुधा आयुष्याच्या मधल्या पायरीवरच्या असाव्यात. त्यामध्ये त्या एका परिपक्वतेच्या दिशेने जाताना दिसतात. आपली मुळे शोधून बघतात. आपण कोण? याचा विचार त्यांना अस्वस्थ करू लागतो. या कविता संग्रहात अशा कविता थोड्या व विखुरलेल्या असल्या तरी सुहासिनींना समजून घेण्यासाठी त्या महत्त्वाच्या आहेत.

*ही जेथ संपते का*
*तेथे पुन्हा सुरू हो?*








**संवेदनांची टोके इथे स्वतःच्या आतच रुतलेली आहेत आणि 'स्व'च्या संदर्भात जीवनाचा शोध घेण्याची प्रक्रिया सुरू आहे. 'वेदनांचा वेद' या कवितेतही पाकळ्या गळत असताना ओळ घट्ट मिटून घेणे, पाखरे दशदिशांना उडून गेल्यावरही मनबंध तुटू न देणे, जिवलगांचे दूर जाणे वाहत्या वाऱ्यात विरून जाणे हे सगळे महत्प्रयासाने दाबून धरताना त्या जीवनाला म्हणतात,**

**तू दिले ओठास हासू लोचनी आसू दिले**
**जीवना तू जे दिले ते हासुनी मी साहिले**
**मी उभी वणव्यात जळते, गीत फुलते गात रे**
**मी कधी येऊ दिला ना पापणीला पूर रे**

**(वेदनांचा वेद)**

*आयुष्य ही कहाणी*
*कळली कुणा कधी हो?* (आयुष्य ही कहाणी)

आयुष्याबद्दलचे प्रश्न जेव्हा पडू लागतात, तेव्हा ती व्यक्ती स्वतःबद्दल प्रश्न करू लागण्याची सुरुवात होते. जीवन म्हणजे आपणच आपणास ओंजळ भरून वाहावं असं अर्घ्य, आपलीच ओळख हरवून आपणातून उठून पुन्हा आपणातच परतणारी एक निःशब्द लाट,

*आपणच आपणास*
*वाचत रहावे पुनःपुन्हा*
*आणि अनोळखीच होत जावे अखेर*
*अशी आर्ष लिपीतील*
*अगम्य दंतकथा*
*जीवन.* (आपणच आपणास)

संवेदनांची टोके इथे स्वतःच्या आतच रुतलेली आहेत आणि 'स्व'च्या संदर्भात जीवनाचा शोध घेण्याची प्रक्रिया सुरू आहे. 'वेदनांचा वेद' या कवितेतही पाकळ्या गळत असताना ओळ घट्ट मिटून घेणे, पाखरे दशदिशांना उडून गेल्यावरही मनबंध तुटू न देणे, जिवलगांचे दूर जाणे वाहत्या वाऱ्यात विरून जाणे हे सगळे महत्प्रयासाने दाबून धरताना त्या जीवनाला म्हणतात,

*तू दिले ओठास हासू लोचनी आसू दिले*
*जीवना तू जे दिले ते हासुनी मी साहिले*
*मी उभी वणव्यात जळते, गीत फुलते गात रे*
*मी कधी येऊ दिला ना पापणीला पूर रे* (वेदनांचा वेद)

अतिशय काव्यात्म प्रतिमांमधून वेदनांचा वेद आणि यातनांचा यज्ञ करणाऱ्या एका मानिनी स्त्रीचे जगण्यातले सारे आर्त इथे फार प्रभावीपणे व्यक्त होते. 'या सनातन अभेद्य कारागृहात' या कवितेतही जगण्यातले एक वैफल्य कारागृहाच्या रूपकातून एखाद्या शिल्पासारखे आकार घेत राहते. 'कोणत्या जन्मीच्या अक्षम्य अपराधांसाठी भोगतीये मी ही जन्मठेप?' हे आठवण्याइतकीही जीवनासक्ती जेव्हा उरत नाही तेव्हा अस्तित्वाचा कण न् कण क्षणाक्षणाने मरणाच्या मिठीत सरकत जातो, अशा वेळी कारागृहाधिपतीचे,

*ज्याचे अस्तित्व जगूही देत नाही*
*अथवा मरूही देत नाही मला*

अशा कात्रीत अडकलेल्या जगण्याचे विद्ध करणारे चित्रण वाचकाला सुन्न केल्याशिवाय राहत नाही.

आईवडिलांच्या, माहेरच्या स्मरणरंजक आठवणीतून सुहासिनी आपले आणि आपल्या अभेद्य मुळाचे नाते घट्ट करताना दिसतात. त्या काळातले जीवन, नाते लिहिण्यातले मायने, त्या वेळची भाषा हे सगळे कवितेत आणताना वृद्धत्वाची शाल पांघरून अंतिम यात्रेसाठी काळोखात बुडत जाणाऱ्या पाऊलवाटेने अंतिम यात्रेसाठी निघालेल्या आईची प्रतिमा त्या हुबेहूब व्यक्त करतात.

स्वतःच्या वृद्धपणातील अंतिम दिवसांबद्दल लिहिलेल्या 'या मौन जांभळ्या क्षणी (२००९)' या कवितासंग्रहातून इथे घेतलेल्या कविता हा सुहासिनींच्या काव्यजीवनाचा शेवटचा टप्पा. मृत्यू समीप आल्याच्या चाहुलीतही त्यांच्या काव्यप्रतिभेचा इतका उत्तुंग आविष्कार कवितेमधून व्हावा ही घटनाच त्यांच्या कवितेवरील जिवापाड प्रेमाची द्योतक आहे. या सर्वच कविता अतिशय शांत, संयतचित्ताने लिहिलेल्या आणि जीवनमरणाच्या सीमारेषेवर हिंदकळणाऱ्या भावनांना नेमकेपणाने शब्दांत पकडणाऱ्या आहेत हे विशेष.

'या मौन जांभळ्याक्षणी' ही भावगर्भ कविता पाऊलखुणा मिटत जाताना मागे उरलेल्या कडूगोड आठवणींना प्रतिमांच्या भाषेत बद्ध करते. जगण्यापूर्वीच जगण्याचा अर्थ लावून बघताना आपल्याच सांजसावल्या आपल्याला पोरक्या होत राहतात हे कवितेचे आशयसूत्र अनुभवाच्या संपृक्ततेतून अर्थघन होते. 'उतरंड' ही कविताही याच अर्थाची आहे, जेव्हा आयुष्याच्या अंतिम टप्प्यावर मागचं उभं आयुष्य मनात साठून येतं. डंख मारण्यासाठी उभ्या असलेल्या जहरी आठवणी जेव्हा भूतकाळाला पुरूनही वर येतात, तेव्हा कवीला वाटते की,



अनुक्रमणिका



मृत्यूच्या वेदनाही याहून अधिक दयाघन असाव्यात. जन्म आणि मृत्यू, एका किनाऱ्यावरून निघालेलं जहाज कोणत्या क्षणाला फुटणार हे कुणालाच ठाऊक नसतं; पण हा शाप साऱ्या मानवतेलाच आहे आणि युगानुयुगं जहाज चालतच आहे, म्हणून खंत न करता कवी सुहासिनी 'आभाळी प्रार्थना' करताना दिसतात. 'डायरी' या कवितेतही त्यांना हेच प्रश्न पडतात की,

*माणूस म्हणजे नाव?*
*की नुसतीच अक्षरं?*
*फक्त हाडामासाचं गाठोडं?*
*मग माणूस कुठे असतो?*
*तो जातो ते कुठे?*

हा खरे तर प्रत्येकालाच प्रश्न असतो. मेल्याशिवाय त्याचं उत्तर कळत नाही, आणि मेल्यावर त्याचं उत्तर देता येत नाही. तिथे ना प्रश्न उरतो ना उत्तर! हा मनुष्यजन्माचा सनातन पेच आहे.

*येईल क्षण असा एक*
*होईल तनू जीर्ण पान*
*मिटून पंख थरथरेल*
*वृक्षावर गूढ गान* (ये इतुका जवळ की)

सागरात एकटी नाव निघणे, थकलेल्या हातांना फुलांचा भारही सहन न होणे, गळ्यातल्या गहिवरांना शब्दही न आठवणे, काळ्या डोहाकाठी पाऊलवाटा पोचणे या सगळ्या मृत्यूसमीप नेणाऱ्या प्रतिमा अंगावर येतात,

*आता हे स्वीकारलंच पाहिजे*
*तुला नि मला एकदा*
*की प्रत्येक प्रवासालाच असतो*
*अखेर एक अदय किनारा* (आता हे स्वीकारलंच पाहिजे)

मृत्यूची ही अशी अपरिहार्यता, कवीच्या हृदयातील भावभावनांची आंदोलने, जगण्याच्या असोशीच्या पार्श्वभूमीवर अधिकच 'अदय' वाटू लागते.

'सायंकालीन भावोत्कट प्रहरात' या कवितेत रूपकार्थाने पुन्हा मृत्यूच्या अनिश्चिततेचे भय दाटून येते. नदीप्रवाहात विसर्जित केलेले आणि आपल्याच तंद्रीत न परतीच्या प्रवासाकडे अज्ञात प्रदेशाकडे डुलत झुलत जाणारे दीपद्रोण हे माणसाच्याच मृत्यूकडे जाणाऱ्या प्रवासाचे रूपक आहे.

'देहान्त' ही कविता अशा सगळ्या कवितागुच्छातील एका अत्यंत मनस्वी स्त्रीच्या ताठपणाची सर्वोत्तम कविता आहे. मरणसूक्त गात अंधारगुहेत प्रवेश करण्याची देहान्त शिक्षा कवी स्वेच्छेने स्वतःला देत आहे. कवीनेच आपले सर्जनशील हात छाटले आहेत. स्वप्नांवर मणामणाच्या अंधारगोण्या पांघरल्या आहेत.

*ताठ मानेनं जगण्याच्या*
*अक्षम्य अपराधासाठी*
*मीच माझ्यावर केले*
*निघृण वार सपासप*

हो (self renunciation) स्व-परित्याग ही प्रचंड धैर्याची आणि स्वतःची परीक्षा पाहण्याची गोष्ट आहे. स्वतःलाच अन्यायालयातील न्यायालयापुढे उभे करताना

*संवेदनाधीर जगण्यास*
*ठाम नकार देण्याचा*
*अक्षम्य गुन्हा शाबीत माझ्यावर*

सर्व आयुष्य इतके संवेदनाक्षमवृत्तीने घालविलेल्या व्यक्तीचे हे ताठ मानेने, कुणापुढेही न झुकता केलेले आत्मसमर्पण आहे. मृत्यूलाही मारून गेल्याची भव्य उदात्त उत्कटता त्यात आहे. एकूणच सुहासिनींच्या काव्यप्रवासातील हा शेवटचा टप्पा एक अतिशय परिपक्व, पिकलेल्या फळाच्या गळून जाण्यातली शोकात्म सौंदर्यानुभूती देणारा आहे.

सुहासिनी इर्लेकर आज आपल्यात नाहीत. त्यांचा जो थोडा चुटपुटता सहवास मला लाभला त्या वेळी जाणवलेली त्यांची काव्यात्मक व्यक्तिगतता या संग्रहाच्या निमित्ताने पुन्हा एकदा मनाला भिडली आणि त्यांच्या अक्षर (अ-क्षर) संपदेतून त्या पुनश्च एकदा भेटल्याचा आनंद मी अनुभवला. कवी, लेखक, विद्वान, अभ्यासक, समर्पित अध्यापक म्हणून त्या थोर होत्याच; पण माणूस म्हणूनही त्या दुसऱ्यांची कदर करणाऱ्या, अतिशय रसरशीत व्यक्तिमत्त्वाच्या होत्या. 'सांगा त्यांना' या कवितेत 'नाही ती आता नाही' असे म्हणताना त्या म्हणतात,

*लावून डोळे वाटेवरती*
*उरतिल केवळ कविता अंती*
*अक्षरांत निःश्वास दाटतील*
*अन् पाने फडफडुनी वदतील*
*'नसेल ती तेथे, परि अमुच्या*
*अंतरात ती नांदत आहे*
*येथे ती असणारच आहे'*

त्यांच्याच काव्यरसाचा अर्घ्य त्यांना देते.

●

**अश्विनी धोंगडे**
चलभाष : ९९७५६१३१३८








लेख

वंदना आकाशकर

# श्रीचक्रधरांचा स्त्रीविषयक दृष्टिकोन

महानुभाव पंथसंस्थापक श्रीचक्रधरांनी १२व्या शतकाच्या उत्तरार्धात जीवोद्धाराच्या हेतूने तत्त्वज्ञान सांगितलेले आहे. धार्मिक क्षेत्रातील स्त्रियांचे स्वातंत्र्य, स्त्री-पुरुष समता आणि मानवतावाद या जीवनमूल्यांचा त्यांनी स्वीकार केलेला आहे. महानुभाव पंथाच्या तत्त्वज्ञानातील जीव, देवता, प्रपंच व परमेश्वर या चार पदार्थांच्या मांडणीत जीवदेखील पूर्णतः स्वतंत्र असल्याचे म्हटलेले आहे. जीवाने स्वतंत्ररीत्या विचार करून स्व-जीवनाबरोबर समाजोपयोगी कार्य करावे. यातून आत्मोन्नती व समाजोन्नती साधावी हे श्रीचक्रधरांच्या कृती आणि उक्तीतून आपणास स्पष्ट होऊ शकते.

**प्राचीन धर्म आणि स्त्रियांचे स्थान :**

प्राचीन धर्मशास्त्रात उल्लेखिलेल्या धर्मसिद्धांतानुसार मध्ययुगीन काळात स्त्रियांवर अन्याय व अत्याचार होत होते. मध्ययुगीन काळात स्त्रियांना जन्मापासूनच तुच्छतेची, हीनतेची आणि दुय्यमतेची वागणूक दिली जात होती. या कालखंडात कर्मसिद्धांत, कर्मविपाक आणि पुनर्जन्म प्रमाण मानले जात होते. त्यामुळे वाईट कर्म केल्याने स्त्रीचा जन्म प्राप्त होत असल्याचे म्हटले जाई. या त्यांच्या धर्माभिमान व रूढींचे पडसाद यादवकालखंडात पडलेले दिसतात. यानुसारच तत्कालीन स्त्रियांचे धार्मिक व सामाजिक स्थान निश्चित झाले होते.



स्त्रिया या विद्वान व कर्तृत्ववान त्यांच्या स्वतःच्या पूर्वपुण्याईमुळेच झाल्या असल्याचे स्त्रियांच्या मनात रुजवले जाई. अशा समजुतीस पुराणकारांनीही कथा व उपकथानके रचून हातभार लावला होता. परिणामी, स्त्रियांचे मनोबल खचले होते. यामुळे आपण वेगळे व चांगले काम करून कर्तृत्व गाजवू शकत नाही, अशी त्यांची मनोधारणा तयार केली गेली होती. परिणामी, या स्त्रियांनी आपण कर्तृत्वशून्य व निर्बुद्ध आहोत अशी स्वतःची समजूत करून घेतल्याने त्या दैववादी बनल्या होत्या. रूढी-परंपरेनुसार बालविवाह व जरठकुमारी विवाह होत असत. पती वयाने मोठा असल्याने ती मुलगी बालपणीच विधवा होत असे. यातून येणाऱ्या वैधव्यात स्त्रीला आपल्या राहत्या घरात ओझ्यासारखी वागणूक दिली जाई. विधवा स्त्रियांच्या मानेवर वेगवेगळ्या बंधनांचे जोखड जुंपले जात असे. त्यांना धार्मिक विधीतून बाजूला काढून त्यांच्यावर एक प्रकारची विरक्ती लादली जाई. विधवा स्त्रियांना विविध व्रत-वैकल्यं, उपास-तापास करायला लावून त्यांचे शारीरिक स्वास्थ्य कमकुवत केले जात असे. या धर्मनिष्ठेच्या आधारावरच त्यांच्यावर मानसिक गुलामगिरी लादली गेली होती. घरातील चूल, मूल आणि देवताभक्ती यात त्यांना गुंतविण्यात आले होते. सामाजिक सण-समारंभात त्यांना विधवा असल्याने सामावून घेतले जात नसे. त्या अशुभ समजल्या जाऊन त्यांना कमी प्रतीचे स्थान मिळत असे. अशाप्रकारे तत्कालीन विधवा स्त्रियांच्या शारीरिक व मानसिक स्वास्थ्यावर अनेक प्रकारचे आघात होत होते. या कारणांमुळे स्त्रियांच्या जीवनात एक प्रकारची चौकट निर्माण झाली होती. बाराव्या शतकात बालविवाह, जरठकुमारी विवाह, सासुरवास, परित्यक्तपण, बहुपत्नीत्व, वैधव्य यांसारख्या समस्यांना स्त्रियांना तोंड द्यावे लागत होते.



अनुक्रमणिका









**श्रीचक्रधरांच्या गुजरात, कर्नाटक आणि महाराष्ट्र या प्रदेशातील भ्रमंतीत त्यांना समाज व कुटुंब यांमधील स्त्रीविषयक दृष्टिकोन पाहावयास मिळाला होता. स्त्रियांची कुचंबणा व पुरुषी सत्तेचा असलेला विळखा याची त्यांना जाणीव झाली होती. स्त्रियांच्या मनातील भावना व श्रद्धा यांचीही त्यांना जाणीव झाली होती. याकरिताच त्यांनी आपल्या पंथीय तत्त्वज्ञानातील स्त्रियांना धार्मिक स्वातंत्र्य दिले असल्याचे म्हणता येईल.**





स्त्रियांच्या स्वातंत्र्य व अधिकारावर मर्यादा घातल्या गेल्या होत्या.

या काळातील स्त्री ही परावलंबी, अबला व हीन असल्याचे मानले जाई. स्त्रियांना कुटुंबसंस्थेत अधिकाराचे स्थान नव्हते. स्त्रियांच्या हिताचे असणारे महत्त्वाचे निर्णय घरातील कुटुंबप्रमुख पुरुष किंवा पतीच घेत असे. हे निर्णय चुकीचे असले तरी स्त्रियांना ते निमूटपणे स्वीकारावे लागत असत. या सर्व दुष्प्रथांमुळे स्त्रियांना आपले जगणे नकोसे वाटत होते. प्राचीन काळात गार्गी व मैत्रेयी या स्त्रियांनी शिक्षण घेतले असल्याचा संदर्भ आपणास पाहावयास मिळतो. मध्ययुगातील स्त्रियांकडून स्त्रीशिक्षणाचा हा हक्कच हिरावून घेतला होता. यामुळे स्त्रीशिक्षणाबाबतचे संदर्भ या काळात पाहावयास मिळत नाहीत. याला अपवाद राजघराण्यांतील स्त्रियांचा आहे. राजघराण्यांतील स्त्रियांना क्वचितच, जुजबी शिक्षण दिले जात असे. धर्मशास्त्रकारांनी आई-वडील, सासू-सासरे, पती हेच स्त्रियांचे योग्य मार्गदर्शक असून, घर हेच तिचे संस्कारकेंद्र असल्याचे म्हटले होते. स्त्रियांना घरगुती कामाविषयीचे शिक्षण घरातच दिले जात असे. स्त्रियांना धार्मिक किंवा व्यावहारिक शिक्षण क्वचितच, अपवादात्मक परिस्थितीतच दिले जात असल्याचे सांगता येईल. अशाप्रकारे तेराव्या शतकात स्त्रियांना सामाजिक व्यवहार, व्यक्तिस्वातंत्र्य आणि आर्थिक स्वातंत्र्य पूर्णपणे नाकारले असल्याचे दिसून येते. या सर्व समस्यांनी पिडलेल्या स्त्रियांना आपली आपुलकी आणि सहानुभूती वाटणारे कोणीतरी असावे असे वाटणे साहजिक होते.

श्रीचक्रधरांच्या गुजरात, कर्नाटक आणि महाराष्ट्र या प्रदेशातील भ्रमंतीत त्यांना समाज व कुटुंब यांमधील स्त्रीविषयक दृष्टिकोन पाहावयास मिळाला होता. स्त्रियांची कुचंबणा व पुरुषी सत्तेचा असलेला विळखा याची त्यांना जाणीव झाली होती. स्त्रियांच्या मनातील भावना व श्रद्धा यांचीही त्यांना जाणीव झाली होती. याकरिताच त्यांनी आपल्या पंथीय तत्त्वज्ञानातील स्त्रियांना धार्मिक स्वातंत्र्य दिले असल्याचे म्हणता येईल.

यादवकाळातील सामाजिक परिस्थितीचा विचार करता लीळाचरित्रातील श्रीचक्रधरांच्या वर्तनातून जागोजागी विखुरलेली धार्मिक क्षेत्रातील स्त्री-पुरुष समता, स्त्रियांचे धार्मिक स्वातंत्र्य आणि मानवतावाद यासंदर्भातील उदाहरणे पाहावयास मिळतात. या पार्श्वभूमीवर श्रीचक्रधरांचा स्त्रियांकडे पाहण्याचा स्वातंत्र्यविषयक, समतेचा, ज्ञानपूर्वक वर्तनाबाबतचा दृष्टिकोन पुढीलप्रमाणे स्पष्ट होतो.

**१) स्त्री-स्वातंत्र्य :**

श्रीचक्रधर भेटावयास आलेल्या स्त्रीपुरुषांना प्रसंगानुरूप जीवनविषयक तत्त्वज्ञान सांगत असत. श्रीचक्रधरांना भेटायला आलेल्या राणाइसाला ते जेव्हा 'जेवण का करीत नाही,' असा प्रश्न विचारतात. यावर राणाइसा म्हणते, माझी व लाखाइसाची शिदोरी एकत्र आहे. ती आल्यावरच आपण जेवणार असल्याचे राणाइसा श्रीचक्रधरांना सांगते. यावर श्रीचक्रधर म्हणतात, "बाइ स्वातंत्रीय हा मोक्षू प्रतंत्रीय हा बंधुः" (लीळाचरित्र पूर्वार्ध ५०७). जीवावर अनेक प्रकारची बंधने लादली जातात. याला स्त्रियादेखील अपवाद नाहीत. जीवाला स्वावलंबी व आनंदी राहायचे असेल, तर त्याने स्वतंत्रपणे राहून स्वतंत्र विचार करावयास पाहिजे. या ठिकाणी मोक्ष याचा अर्थ विविध बंधनांतून मुक्तता असा आहे. सर्व प्रकारची बंधने झुगारून देण्यास श्रीचक्रधर राणाइसाला सांगताना दिसतात.

श्रीचक्रधरांनी पुरुषाप्रमाणेच स्त्री हा समाजातील महत्वाचा घटक असल्याचे जाणले होते. त्यासाठी त्यांनी स्त्रियांना स्वतंत्रतेचे महत्त्वही पटवून दिले होते. श्रीचक्रधरांना स्त्रियांचे अज्ञान निर्मूलन करून आध्यात्मिकदृष्ट्या त्यांना सक्षम करावयाचे होते. त्यासाठी त्यांनी आपल्या स्त्री शिष्यांशी तत्त्वज्ञानविषयक चर्चा







केल्या होत्या. त्यांची जिज्ञासा जागृत करून वास्तव परिस्थितीची त्यांना जाणीव करून देण्याचा प्रयत्न केला. वरील प्रसंगानुरूप धार्मिक क्षेत्रात स्त्री स्वातंत्र्य रुजविण्यासाठी स्त्रियांना पंथात प्रवेश देऊन त्यादृष्टीने त्यांची मानसिक घडण तयार केली असल्याचे दिसते. अशा प्रकारे श्रीचक्रधरांना सामाजिक क्षेत्रात स्त्रीस्वातंत्र्य देण्यास अनुकूल वातावरण नव्हते. यासाठी त्यांनी धार्मिक क्षेत्रात स्त्रीस्वातंत्र्याचा जोरदार पुरस्कार केल्याचे म्हणता येऊ शकते.

बोणेबाई ही स्त्री त्र्यंबकेश्वरच्या प्रवासासाठी श्रीचक्रधरांना आपल्यासोबत घेते. त्र्यंबकेश्वराच्या यात्रेकरूंसह या दोघांचा पैठण या शहरात मुक्काम होतो. त्र्यंबकेश्वराच्या पुढील प्रवासासाठी निघालेल्या बोणेबाईला श्रीचक्रधर स्वतंत्रपणे पुढे जाण्यास सांगतात. याप्रसंगी श्रीचक्रधरांना बोणेबाईच्यासोबत न जाता पैठणला थांबावयाचे असते. याकरिता श्रीचक्रधर बोणेबाईला स्वतःसाठी थांबवून ठेवत नाहीत, पुढील प्रवासासाठी तिला मनाई करीत नाही किंवा पुरुषांबरोबरच स्त्रियांनी प्रवास करावा असे देखील म्हणत नाहीत. याउलट बोणेबाईचा त्र्यंबकेश्वरला जाण्याचा उत्साह पाहून तिला पुढील प्रवासासाठी जाण्याची परवानगी देतात. यावरून श्रीचक्रधरांचा स्त्रियांच्या मनातील श्रद्धाभाव जोपासण्याचा स्त्रीविषयक दृष्टिकोन व धार्मिक क्षेत्रातील स्त्रीस्वातंत्र्यविषयक भूमिकाच स्पष्ट होते. (लीळाचरित्र पूर्वार्ध पृ. १०६)

सालबर्डीच्या अरण्यात श्रीचक्रधर मुक्ताबाईला भेटावयास जात असल्याचे लीळाचरित्रातून आपणास वाचावयास मिळते; परंतु तत्कालीन कालखंडाचा विचार करता येथे असे म्हणता येईल की, बाह्यदृष्टीने पाहता श्रीचक्रधरांनी मुक्ताबाईस भेट देणे हे एक कारण आहे. खरे तर श्रीचक्रधरांना मुक्ताबाईसारखी संन्यस्त स्त्री स्वतंत्रपणे आध्यात्मिक क्षेत्रात स्वातंत्र्य कशी उपभोगते आहे हे पाहावयाचे असावे. (लीळाचरित्र पूर्वार्ध पृ. २३)

**२) स्त्रीपुरुष समता :**

श्रीचक्रधर स्त्रियांची संकटप्रसंगी कृतीद्वारे काळजी वाहताना दिसतात. दादोसांची राणाइसा ही शिष्या होती. राणाइसा ही दादोसांसाठी रात्रीच्यावेळी विहिरीवर पाणी आणावयास गेली होती. रात्रीच्या वेळेस विहिरीवर पाणी आणावयास गेलेल्या राणाइसाबाबत कोणताही अघटित प्रसंग घडण्याची शक्यता श्रीचक्रधरांनी जाणली होती. यामुळे ते लगेचच रात्रीच्या वेळेस नाथोबाला विहिरीवर पाणी आणावयास पाठवितात. त्यावेळी विहिरीतून बाहेर येऊ न शकणाऱ्या राणाइसाला नाथोबा विहिरीतून बाहेर पडण्यास मदत करतात. दुसऱ्या दिवशी सकाळी श्रीचक्रधर दादोसांना म्हणतात, ''महात्मे हो एकली स्त्री तेव्हडेया वेळा तैसीया स्थाना न धडीजे कीः स्वयं दास्यं तयस्विनांः'' (लीळा उत्तरार्ध. २५६). यावरून पुरुषाने गुरुत्व मिरवून रात्रीच्या वेळी स्त्री शिष्यांकडून आपले काम करवून घेऊ नये असे श्रीचक्रधर सांगताना दिसतात. याशिवाय तपस्वी संन्यासाने स्वतःची कामे स्वतः करावयाची असतात, असे श्रीचक्रधर दादोसांना म्हणतात. याठिकाणी श्रीचक्रधरांचा स्त्री-पुरुष समानतेचा दृष्टिकोन स्पष्टपणे दिसून येतो.

**३. स्त्रीपुरुष सामर्थ्याची जाणीव**

जीवाने अंधश्रद्धेने रूढी-परंपरांना मूक मान्यता देऊन कोणतीही गोष्ट करू नये. प्रत्येक गोष्ट करण्याआधी त्यामागचे कारण जाणून ती गोष्ट केल्यास संबंधित कृती चांगल्याप्रकारे करता येऊ शकते असेच श्रीचक्रधरांनी पुढील काही लीळांमधून सांगितले असल्याचे दिसते. सर्व भक्तमंडळी भटोबासांना श्रीचक्रधरांच्या आज्ञेनुसार सांडोवा म्हणजे नदी किंवा ओढ्यातील दगडी पायवाट बांधण्यास मदत करीत होते. दोन दिवस हे काम चालले होते. तिसऱ्या दिवशी या बांधकामासाठी लागणारी एक भली मोठी शिळा भटोबांसह अनेक भक्तजन जागची हलविण्याचा प्रयत्न करीत होते; परंतु सर्वांनाच ही शिळा जागची हलविण्यात अपयश आले होते. अशाप्रसंगी श्रीचक्रधर राणाइसा या शिष्येला म्हणतात, ''बाइः कासोटा देयाः मग बैसाः माघोतें हात टेंकाः दोही पाइं सीळ लोटाः'' (लीळा उत्तरार्ध १८). श्रीचक्रधर राणाइसाला दगडास योग्य ठिकाणी जोर देण्यास सांगतात. याप्रमाणे राणाइसाने शिळेला जोर लावताच शिळा ढकललेली पाहून सर्व भक्तजनांना आश्चर्य वाटते. याप्रसंगावरून श्रीचक्रधर बारीकसारीक कृतींमधून स्त्रियांच्या अंगातील बलाचे प्रात्यक्षिक स्त्रियांना व भक्तजनांना दाखवून देत असलेले दिसतात. यावरून श्रीचक्रधर स्त्रियांच्या अंगातील क्षमतेला ज्ञानाने उजाळा देऊन प्रेरित करीत असलेले दिसून येतात.

**४) रूढी परंपरांचा त्याग**

तत्कालीन समाजव्यवस्थेने विधवा स्त्रियांच्या मनात शुद्धी-अशुद्धीच्या भ्रामक कल्पना बिंबवून या समजुतींमध्ये त्यांना गुरफटवून टाकले होते. यामुळे शौचाला जाऊन आलेल्या आऊसाच्या मनात हात, पाय न धुतल्याने

**श्रीचक्रधरांच्या स्त्री शिष्या या ब्राह्मणी परंपरेच्या अभिमान बाळगणाऱ्या होत्या. एकाइसा ही विधवा अवेळी स्नान करून येऊन श्रीचक्रधरांना दंडवत करते. श्रीचक्रधर तिला अवेळी स्नान करण्यामागील कारण विचारतात. तेव्हा ती म्हणते, ''आम्हा विधवा स्त्रियांना या वेळीही स्नान करावेच लागते.'' विधवा स्त्रीदेहाबद्दलची अशुद्धीची कल्पना स्त्रियांच्या मनात असल्याने त्यांना स्नान करावे लागत असल्याचे श्रीचक्रधरांच्या लक्षात येते. याप्रसंगी श्रीचक्रधर तत्त्वज्ञानाची जाणीव करून देतात. तत्कालीन रूढींना शह देत एकाइसाला श्रीचक्रधर म्हणतात, ''बाइ तुमचा काइ म्रीत्यपति? तुमचा तो नित्यपती कीः'' श्रीचक्रधर एकाइसाला म्हणतात देहाच्या पतीचा मृत्यू होत असतो. तुम्ही तर परमेश्वराची उपासना करता. परमेश्वराला मृत्यू नसतो. परमेश्वर हाच तुमचा नित्यपती आहे.**

अशुद्धीची कल्पना होती. याकरिता श्रीचक्रधरांना पाहूनही दंडवत न करता ती लांबून निघून जात असते. यावर श्रीचक्रधर आउसाला विचारतात, ''दंडवत का करीत नाही.'' आउसा श्रीचक्रधरांना श्रीचक्रधरांना म्हणते, ''मी अशुद्ध आहे.'' शुद्ध-अशुद्ध या विषयीच्या निरर्थक कल्पना दूर करण्याच्या निमित्ताने श्रीचक्रधर आउसाला म्हणतात, ''मनिंचे अभिळाख निवर्तले तरि सुचि असुचि यें दोन्ही नाही नायकाः'' (लीळा. उत्तरार्ध ५३७). श्रीचक्रधर संन्यस्त आउसाला षडविकारांचा त्याग करण्यास सांगतात. त्यातही इच्छा व लोभ या गोष्टी विशेषतः त्याज्य असल्याचे सांगतात. या प्रमुख दोन गोष्टींचा त्याग केल्यास पवित्र व अपवित्र अशा कल्पना मनात न आणण्याबाबत श्रीचक्रधर आउसाला सांगतात. अशाप्रकारे श्रीचक्रधर मानवी मनातील कल्पनांना टाकून देऊन संन्यस्ताचा आचार करावयास सांगतात. अशा रीतीने श्रीचक्रधर आपल्या स्त्री शिष्यांना छोट्या-मोठ्या प्रसंगातून चुकीच्या कल्पनांची जाणीव करून देऊन त्यामागील कारणे सांगताना दिसतात.

श्रीचक्रधरांच्या स्त्री शिष्या या ब्राह्मणी परंपरेच्या अभिमान बाळगणाऱ्या होत्या. एकाइसा ही विधवा अवेळी स्नान करून येऊन श्रीचक्रधरांना दंडवत करते. श्रीचक्रधर तिला अवेळी स्नान करण्यामागील कारण विचारतात. तेव्हा ती म्हणते, ''आम्हा विधवा स्त्रियांना या वेळीही स्नान करावेच लागते.'' विधवा स्त्रीदेहाबद्दलची अशुद्धीची कल्पना स्त्रियांच्या मनात असल्याने त्यांना स्नान करावे लागत असल्याचे श्रीचक्रधरांच्या लक्षात येते. याप्रसंगी श्रीचक्रधर तत्त्वज्ञानाची जाणीव करून देतात. तत्कालीन रूढींना शह देत एकाइसाला श्रीचक्रधर म्हणतात, ''बाइ तुमचा काइ म्रीत्यपति? तुमचा तो नित्यपती कीः'' श्रीचक्रधर एकाइसाला म्हणतात देहाच्या पतीचा मृत्यू होत असतो. तुम्ही तर परमेश्वराची उपासना करता. परमेश्वराला मृत्यू नसतो. परमेश्वर हाच तुमचा नित्यपती आहे. अशारीतीने श्रीचक्रधर तत्कालीन थोतांड व खुळचट प्रथांचे विवेचन करतात. यावरून वैधव्याचे अपमानित जीवन जगणाऱ्या स्त्रियांच्या परिस्थितीची येथे आपणास जाणीव होते. याप्रकारे तत्कालीन रूढी परंपरेतील अपवित्र, अशुद्ध मानल्या गेलेल्या विधवा स्त्रीदेहाबाबत श्रीचक्रधर एकाइसाशी संवाद साधून तिला मानसिक आधार देऊन तिचे मानसिक सक्षमीकरण करताना दिसतात. स्त्रियांना असणाऱ्या मासिकधर्माबाबतच्या अस्पर्शतेचा संदर्भही श्रीचक्रधरांनी अमान्य केलेला आहे. तत्कालीन परिस्थितीत असे विचार मांडणे धाडसाचे होते. महानुभाव पंथात ब्राह्मण विधवा स्त्रिया जास्त असल्याने त्यांच्या मनात शुद्धी-अशुद्धी, विटाळ, अस्पर्श या कल्पना रुंजी घालत होत्या. मासिकधर्म चालू असल्याने उमाइसा श्रीचक्रधरांना दुरूनच नमस्कार करते यावर उमाइसाला श्रीचक्रधर म्हणतात, ''बाइः यें नवद्वारेः जैसा नाकी सेंवुडे एः डोळ्या चीपडी एतिः कानां मळू एः तोंडा थुंका एः गूदद्वारां मळ एतिः तैसी हे एकी धातु स्रवेः मग नीवर्तेः'' (लीळा उत्तरार्ध ३८३). पाच ज्ञानेंद्रियं व पाच कर्मेंद्रियं आहेत. त्यातील कान, नाक, डोळे यांसारख्या अवयवांतून अनावश्यक टाकाऊ घटक शरीरातून बाहेर पडतात. त्यामुळे त्याचा कोणी विटाळ मानीत नाहीत. तसेच मासिक धर्माबाबतही विटाळ किंवा अस्पर्श मानू नये असे श्रीचक्रधर उमाइसाला समजावून सांगतात. अशाप्रकारे शुद्धी-अशुद्धी, विटाळ आणि अस्पर्श यांसारख्या स्त्रीदेहाबद्दल असणाऱ्या विटाळाच्या अवैज्ञानिक कल्पना श्रीचक्रधरांनी नाकारलेल्या दिसतात. स्त्रीदेहही पुरुषाप्रमाणेच असून त्याबद्दल मनात वाईट विचार न आणता त्या देहाचाही स्त्रियांनी स्वीकार केला पाहिजे असे श्रीचक्रधर याठिकाणी सांगताना दिसतात. आजही स्त्रियांना मासिकधर्माच्या काळात विशिष्ट देवतेच्या दर्शनासाठी मंदिराच्या गाभाऱ्यात प्रवेश दिला जात नसल्याने स्त्रियांना संघर्ष करावा लागतो. यादृष्टीने त्यामागील श्रीचक्रधरांनी







अनुक्रमणिका

महानुभाव पंथाचा स्वीकार करणाऱ्या स्त्रियांना श्रीचक्रधरांनी पारंपरिक धर्माचा त्याग करावयास सांगितला होता. श्रीकृष्णाष्टमीनिमित्त बोणेबाईंनी उपवास केलेला असल्याचे श्रीचक्रधरांना सांगितले. यावर थोरल्या बोणेबाईला श्रीचक्रधर म्हणतात, "बाइः देवकीए देवीसि श्रीकृष्ण जन्मले तै काइ तीहीं उपवासु केला? पेज तऱ्हीं प्यालीचि कीः" (लीळा पूर्वार्ध, ९५). देवकीपोटी श्रीकृष्ण जन्मले त्याप्रसंगी उपवास न धरता ती पेज प्याली होती. त्याकरिता श्रीचक्रधर व्रत व उपवास करणाऱ्या या धार्मिक थोतांडाला बळी पडण्यापासून बोणेबाईला परावृत्त करून योग्य कारण सांगताना दिसतात.

सांगितलेले वैज्ञानिक कारण स्थानिक पुजाऱ्यांनी लक्षात घेतले, तर हा वाद कायमचा संपू शकतो. म्हणूनच श्रीचक्रधरांचे तत्कालीन स्त्रियांच्या मासिकधर्माबावतचे विचार आजही समाजोपयोगी असल्याचे स्पष्ट होते.

**५) मूर्तिपूजेचा त्याग**

आउसा ही विधवा व नाथपंथाची जोगीण होती. ती प्रवास करता करता गोदावरी नदीच्या काठावरील जोगेश्वरीच्या मंदिराजवळ श्रीचक्रधरांच्या दर्शनास आली होती; परंतु श्रीचक्रधरांमध्ये तिला प्रत्यक्ष श्रीकृष्णच दिसला होता. त्यामुळे तिने श्रीचक्रधरांच्या सान्निध्यात राहण्याचा आपला विचार श्रीचक्रधरांजवळ बोलून दाखविला. आउसाच्याजवळ असणाऱ्या चकाकणाऱ्या पितळी जोगला देवी व शिसवी लाकडाचा श्रीकृष्ण या दोन मूर्तींचे श्रीचक्रधरांनी जलविसर्जन करण्यास सांगितले. तेव्हा आउसा श्रीचक्रधरांना म्हणते, "श्रीकृष्णाच्या श्रीमूर्तीचे विसर्जन करू नका, ही मला प्रवासात मार्गदर्शन करून वाट दाखवते." यावर श्रीचक्रधर आउसाला म्हणतात, "आता साचोकार कृष्णेया तो तुम्हां वाट सांघैलः (लीळाचरित्र पृ.५८४). यापुढे तुम्हाला प्रत्यक्ष श्रीकृष्णरूपाने मी मार्गदर्शन करणार आहे असे श्रीचक्रधर म्हणतात. अशाप्रकारे श्रीचक्रधर श्रीमूर्तीचे जलविसर्जन करावयास लावून तत्कालीन रूढी परंपरांचे मानदंड मोडून काढताना दिसतात. तसेच श्रीचक्रधर आउसाला मूर्तिपूजेत न अडकता स्वतंत्र मार्गाने जीवनप्रवासास प्रवृत्त करताना दिसतात.

**६) भक्तिमार्गाची महती**

एके दिवशी देमाइसा पुराण ऐकून येते. या पुराणात ज्ञान, भक्ती आणि वैराग्य हे संसारापासून मुक्ती देणारे असल्याचे सांगितलेले असते. देमाइसा पुराणात सांगितलेले खरे आहे का असे श्रीचक्रधरांना विचारते, यावर वरील विधान खरे असले तरी ते सहज शक्य नसल्याचे श्रीचक्रधर देमाइसाला सांगतात. यापुढे देमाइसाला श्रीचक्रधर म्हणतात, "बाइ ज्ञानापासी प्रेम उत्तमः" (लीळा पूर्वार्ध, ३५९). तत्कालीन स्त्रिया ज्ञानापासून वंचित असल्याने त्यांना ज्ञानापेक्षाही प्रेम उत्तम असल्याचे श्रीचक्रधर सांगताना दिसतात. तत्कालीन परिस्थितीत स्त्रियांना ज्ञान मिळविणे दुरापास्त होते. यामुळे श्रीचक्रधर ज्ञानापेक्षा प्रेमाची उत्तमता पटवून देताना दिसतात. अशाप्रकारे स्त्रियांना तत्त्वज्ञानाचे ज्ञान नसतानाही ज्ञानाबावत कमी न लेखता श्रीचक्रधर त्यांच्याबरोबर तत्त्वज्ञानावर चर्चा करीत असताना दिसतात. श्रीचक्रधरांनी स्त्रियांशी चर्चा केल्याने त्यांच्यातील चिकित्सकबुद्धी जागी व्हायच्या दृष्टीने या चर्चा उपयुक्त ठरलेल्या दिसतात.

**७) व्रत-उपवासाची डोळस पद्धत**

महानुभाव पंथाचा स्वीकार करणाऱ्या स्त्रियांना श्रीचक्रधरांनी पारंपरिक धर्माचा त्याग करावयास सांगितला होता. श्रीकृष्णाष्टमीनिमित्त बोणेबाईंनी उपवास केलेला असल्याचे श्रीचक्रधरांना सांगितले. यावर थोरल्या बोणेबाईला श्रीचक्रधर म्हणतात, "बाइः देवकीए देवीसि श्रीकृष्ण जन्मले तै काइ तीहीं उपवासु केला? पेज तऱ्हीं प्यालीचि कीः" (लीळा पूर्वार्ध, ९५). देवकीपोटी श्रीकृष्ण जन्मले त्याप्रसंगी उपवास न धरता ती पेज प्याली होती. त्याकरिता श्रीचक्रधर व्रत व उपवास करणाऱ्या या धार्मिक थोतांडाला बळी पडण्यापासून बोणेबाईला परावृत्त करून योग्य कारण सांगताना दिसतात.

स्त्रियांना धार्मिक ज्ञानप्राप्तीचे स्वातंत्र्य नसल्याने त्या अंधश्रद्धेने व्रत, उपास-तापास करीत असत. अशाच एका प्रसंगी श्रीचक्रधरांना महदाइसा विचारते, "महिनाभराचा उपवास माझ्याकडून होऊ न शकल्याने मला पाप लागेल का?" यावर श्रीचक्रधर म्हणतात, "बाइः उपवासु केलेयां आत्मा पीडेः तेणे पाप होएः वर्त केलेयां पुण्य होएः" (लीळा, पूर्वार्ध, ३३०). श्रीचक्रधरांनी महदाइसाला सांगितले उपवास केल्याने पुण्य मिळते; पण न खाता उपवास केल्याने आत्म्याला त्रास होतो आणि यामुळे पाप

म्हणजे आपल्या देहाला दुःख प्राप्त होते. महदाइसा श्रीचक्रधरांना विचारते, ''एकादशीचा उपवास केल्याने जीवाला काय प्राप्त होते?'' महदाईसाला श्रीचक्रधर म्हणतात, ''ऐसे कीजे जे तैचि फळाते देः दोघांदोघां पांती अन घालीजेः नाहीं तरि उपवासू केलेयां नरकचि होति वाईः'' (लीळा पूर्वार्ध, ३३१). श्रीचक्रधर महदाईसाला म्हणतात, ज्यापासून लाभ होणार आहेत अशीच कामे जीवाने केली पाहिजेत. याकरिता नियमानुसार उपवास करून उपवासानंतर भोवतालच्या दोन-चार माणसांना जेऊ घातले पाहिजे. यामुळे चांगले कार्य आपल्या हातून घडू शकते. अन्यथा वर सांगितल्याप्रमाणे न जेवता उपवास केल्याने शरीर व मन यांना त्रास होतो. यामुळेच जीवाला नरक म्हणजेच दुःख, रोग व आजार यांची प्राप्ती होते. अशाप्रकारे श्रीचक्रधरांनी अन्नदानाचे महत्त्व तर सांगितले आहे. याशिवाय जीवनातील कोणतीही गोष्ट ज्ञानपूर्वक, समजून घेऊन करावयास सांगितली आहे. रूढी-परंपरेनुसार चालत आलेले व्रत व उपवास अंधश्रद्धेने न करता आरोग्याला उपयुक्त अशा पद्धतीने उपवास करावयास सांगितले असल्याचे दिसते. याकरिता श्रीचक्रधरांनी व्रत व उपवास यांच्या धार्मिक थोतांडाला बळी न पडता ज्ञानपूर्वक प्रत्येक गोष्ट करण्यास सांगितलेली आहे. यातून श्रीचक्रधरांचा स्त्रियांना ज्ञानयुक्त डोळस बनविण्याचा दृष्टिकोन स्पष्टपणे दिसून येतो

### ८) आचारधर्मानुसार वर्तनास महत्त्व

स्वाभिमानी आउसाला महानुभव पंथाची संन्यस्ताची आचारतत्त्वे माहिती नसल्याने ती दररोज नीटनेटके कपडे घालून, हात पाय धुवून व गंधटिळा करून भिक्षेस जात असे. आउसाचे हे वर्तन श्रीचक्रधरांना पटत नाही. यामुळे श्रीचक्रधर आउसाचे शृंगारयुक्त वर्तन म्हणजे वेश्या स्त्रीचे वर्तन असल्याचे म्हणतात. आउसा श्रीचक्रधरांच्या बोलण्याचा गैरसमज करून घेते. आउसाला श्रीचक्रधरांचे 'वेश्येचे धर्म' हे बोल जिव्हारी लागतात. ती तडक चौधोत्राच्या जवळगावास निघून जाते. तीन दिवस ती श्रीचक्रधरांच्या विरहाने दुःखी होते. स्वतःचा स्वाभिमान आउसाला श्रीचक्रधरांच्या भेटीआड येत असतो. म्हणून ती श्रीचक्रधरांना भेटायला जात नाही. तीन दिवसांनंतर आउसाला घेऊन येण्यास श्रीचक्रधर नाथोबाला पाठवितात. आउसा आल्यावर श्रीचक्रधर स्वतः तिच्या समोर जाऊन तिची भेट घेतात. नंतर श्रीचक्रधर आउसाला तपस्वी संन्यस्त स्त्रीने कसे वागायचे याबाबतचा आचारधर्म समजावून सांगतात. यावरून श्रीचक्रधरांची पंथशिस्त दिसते. याशिवाय श्रीचक्रधरांच्या ठिकाणी स्त्रियांबद्दलची असलेली क्षमाशीलता, दयाळूपणा व कनवाळूपणादेखील दिसून येतो. (लीळा, उत्तरार्ध ३७५)

### ९) स्त्रीस्वभाव व श्रद्धाभाव

एका प्रसंगी नाथोबाला श्रीचक्रधर म्हणतात, ''पुरुषापसि स्त्रिया स्नेहाळुवाः'' (सूत्र, विचारमालिका, १२८). याठिकाणी श्रीचक्रधरांनी पुरुषांपेक्षा स्त्रियांच्या ठिकाणी 'स्नेह' हा विशेष गुण असल्याचे सांगितले आहे. प्रसंगी श्रीचक्रधर स्त्रियांच्या भाबड्या श्रद्धाभावाची प्रशंसा करताना दिसतात. साधा ही स्त्री त्यांची फुलांनी पूजा करते. बाइसा हे पाहून साधाइसाला खडसावतात. साधा रडू लागते. यावर श्रीचक्रधर बाइसाला शांत बसावयास सांगतात. श्रीचक्रधर साधेचा भोळेपणा पाहून बाइसांना म्हणतात, ''ए जरि जाणिता तरि ऐसे का करिति? आणि अन अवस्वरी कां एति?'' (लीळा पूर्वार्ध ४०१). श्रीचक्रधर बाइसाला समजावून सांगतात, साधाइसाला पूजा केव्हा करावी हे माहीत नाही. यामुळेच अज्ञानामध्ये साधाइसाकडून ही चूक झालेली आहे. अशाप्रकारे श्रीचक्रधर एकाचवेळी बाइसा व साधेचे सांत्वन करताना दिसून येतात. एकदा साधाइसाने श्रीचक्रधरांची अतिशय साध्या अशा रिंगणीच्या फुलांनी पूजा केली होती. तिच्या श्रद्धाभावाची प्रशंसा करत श्रीचक्रधर तिला म्हणतात, ''हे काई साधे होः देओ स्वर्णी फुले पुजीजताए माः'' (लीळा, उत्तरार्ध ४३२). श्रीचक्रधर साधाइसाला म्हणतात, तुम्ही माझी सुवर्ण फुलानेच पूजा करीत आहात. याप्रकारे श्रीचक्रधर पिवळ्या रिंगणीच्या साध्या फुलांना सोन्याच्या फुलाचे रूपक देऊन तिच्या श्रद्धाभावाची प्रशंसा करताना दिसतात.

### १०) स्त्रियांबद्दलचा आदरभाव

स्त्रियांच्या वर दिलेल्या उदाहरणांवरून त्यांची मानसिकता आपल्या लक्षात येऊ शकते. तत्कालीन









अनुक्रमणिका

समाजव्यवस्थेने स्त्रियांची पुरुषव्यवस्थेस उपयुक्त अशी मानसिकता बनविलेली होती. पुत्रप्राप्तीमुळे स्वर्ग मिळतो व आपले वंशसातत्य टिकून राहते, अशी समाजाची पारंपरिक धारणा होती. यामुळे पुरुष अपत्याला म्हणजेच पुरुषप्रधान संस्कृतीला महत्त्व प्राप्त झाले होते. पुष्पा गायकवाड यांच्या मते, ''आपणास मुलगी व्हावी अशी मनिषा बाळगणाऱ्या स्त्री-पुरुषांचे एकही उदाहरण तेराव्या शतकातील यादवकालीन समाजात आढळून येत नाही. याउलट स्त्री जन्म हा कुटुंबासाठी दुःखदायकच मानला जात होता.'' पुष्पा गायकवाड म्हणतात, याबाबतची उदाहरणे लीळाचरित्रातील लीळांमधून पहावयास मिळतात. लीळाचरित्रातील एका प्रसंगात मुलगा जन्माला यावा म्हणून ठाकूर अगतिक झालेला दिसून येतो. ठाकूर श्रीचक्रधरांना विनवणी करून घरी घेऊन जाऊन त्यांचा पाहुणचार करतो. यानंतर ठाकूर आपल्या दोन्ही बायकांना चक्रधरांकडे पाठवितो. श्रीचक्रधर या दोन्ही स्त्रियांच्या मागणीला नकार देतात. यानंतर ठाकूर श्रीचक्रधरांकडे येऊन श्रीचक्रधरांना म्हणतो, ''जी जी गोसावी का न स्वीकरीतीचि? मी नीपुत्रीकूः माते पुत्रु नाहीः म्हणौनि पाठवीलीयाः गोसावी मज पुत्रदान द्यावें जीः'' (लीळा, पूर्वार्ध ६३). या लीळेतील प्रसंगानुसार वंशसातत्य टिकविण्यासाठी ठाकूर अगतिक होऊन तत्कालीन समाजधारणेनुसार पुत्रप्राप्तीची इच्छा श्रीचक्रधरांकडे व्यक्त करताना दिसून येतो. याठिकाणी श्रीचक्रधरांच्या नकारातून स्त्रियांविषयीचा आदरभाव दिसून येतो. प्रस्तुत प्रसंगातून श्रीचक्रधरांचा स्त्रीविषयक आदरभावयुक्त दृष्टिकोन स्पष्ट होतो.

**११) समाजमानस व सद्कार्यासाठी वेळेचा उपयोग**

गावचा पाटील गावातील पारावर बसून प्रतिष्ठित मंडळींमध्ये गप्पा मारीत असतो. त्या वेळी पाटलाचा नोकर मालकाला बातमी सांगतो की, तुमच्या सुनेला मुलगा झाला आहे. यावर पाटील पारावरील लोकांना फुशारक्या मारत म्हणतो, ''सूना कोनी रीगतिः तरि लेंकचि होतीः आमतें ऐसेंचिः'' (लीळा, उत्तरार्ध ५०७), पाटील म्हणतो, आमच्याकडे असेच घडत असते. आमच्या घरातील सुना मुलांनाच जन्म देतात. इतकेच नाही, तर दासीदेखील मुलांनाच जन्म देतात. आमच्या घरातील जनावरांसंदर्भात बोलायचे झाले, तर घोड्याच्या मादीदेखील शिंगरूंनाच प्रसवतात. गाई व्याल्या, तर त्यांनाही गोऱ्हेच होतात. म्हैस व्याली, तर तिलाही रेडाच होतो. अशाप्रकारे गावचा पाटील मिशी पिळीत स्वतःच्या घरची फुशारकी मारत असतो. यावरून पुत्र अपत्याला जन्म देण्याबाबत पाटलाचा गर्व त्याच्या बोलण्यातून व स्वतःच्या मिशा पिळण्यावरून याठिकाणी चित्रित होतो. अशाप्रकारे लीळाचरित्रातून तत्कालीन पुरुषप्रधानव्यवस्थेचे दर्शन आपणास घडते. श्रीचक्रधरांना याठिकाणी असे सांगावयाचे असावे की, जीवाने निसर्गतः मिळालेल्या गोष्टीचा अभिमान बाळगता कामा नये, कारण निसर्गावर निश्चितच मनुष्याचा वट चालत नसतो. जीवाने स्व-कर्तृत्वावर वैयक्तिक पातळीवर इतरांपेक्षा वेगळे काही तरी प्राप्त केले पाहिजे. काळ आपल्या हातात नाही तेव्हा मिळालेल्या वेळेचा चांगल्या कार्यासाठी उपयोग करावा. व्यर्थ फुशारकी मारण्यात वेळ वाया घालवू नये.

धार्मिक क्षेत्रातील स्त्री-पुरुष समानता, स्त्रीस्वातंत्र्य, मानवतावाद व ज्ञानयुक्तकृती ही श्रीचक्रधरांची जीवनमूल्ये होती. तत्कालीन स्त्रियांच्या अनेक समस्यांबाबत श्रीचक्रधरांनी आपल्या जीवनमूल्यांद्वारे स्त्रियांच्या मानसिकतेत बदल घडविण्यांचा प्रयत्न केलेला दिसून येतो. प्रत्येक स्त्री-पुरुषाने स्वतःचा विवेक जागा ठेवून कृतीला ज्ञानाची जोड दिली, तर स्व-विकासासोबत समाजाचाही विकास होऊ शकतो, असे त्यांच्या जीवनमूल्यांमधून आपणास दिसून येते. म्हणूनच आजच्या काळातही अशा विचारांची नितांत आवश्यकता असल्याचे स्पष्ट होते.

**संदर्भग्रंथ :**


१. लीळाचरित्र, संपा. वि. भि. कोलते, साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई, १९८२
२. स्त्रीवाद संकल्पना आणि स्वरूप, रचना माने, अक्षर प्रकाशन, कोल्हापूर, २०१३
३. भक्तिपंथाचा जातिविद्रोह स्त्रीमुक्तीच्या प्रेरणा आंबेडकरवादी परिदृष्टीने आकलन, पुष्पा गायकवाड, हरिती प्रकाशन, पुणे, २०१७
४. महानुभाव साहित्य शोधसंचार, अविनाश आवलगावकर, प्रतिमा प्रकाशन, पुणे २००६
५. सूत्रपाठ रहस्यार्थ प्रबोध, संपा., कांताबाई उर्फ आक्काबाईजी लासूरकर, श्रीदत्तकृपा प्रकाशन, नाशिक, २००१


**संक्षेप चिन्हाचे अर्थ :**

- लीळा. - लीळाचरित्र
- सूत्र. - सूत्रपाठ

●


**वंदना शंकर आकाशकर**
सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ,
मराठी विभाग, पुणे ७





अनुक्रमणिका






समीक्षा

उद्धव कानडे

# मनाला उजेड देणारे मातीचे पाय



**ॲड. प्रमोद आडकर**
कार्यवाह,
महाराष्ट्र साहित्य परिषद,
पुणे



हाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्यवाह ॲड. प्रमोद आडकर यांच्या अभ्यासपूर्ण लेखनातून साकारलेल्या 'देखणी ही पावलं' या पुस्तकाचा प्रकाशन समारंभ पुण्यात अनेक मान्यवरांच्या प्रमुख उपस्थितीत नुकताच संपन्न झाला. निसर्गानं दिलेलं मानवी जीवन माणसाला एकदाच अनुभवता येतं. जीवनाला समृद्ध आणि सुंदर बनविण्यासाठी माणसं धडपडत असतात. प्रत्येकालाच जीवनाची समृद्धी आणि जगण्यातली सुंदरता लाभतेच असे नाही. काही माणसं मोठी होताना आपल्या समवेत समाजाचंही भान ठेवतात आणि समाजासाठी जगतात. सामाजिक बांधिलकी जपणाऱ्या १७ व्यक्तींचा शोध घेऊन त्यांच्या व्यापक कर्तृत्वाला अतिशय कुशलपणे या ग्रंथात मांडण्यात ॲड. प्रमोद आडकर लेखक म्हणून प्रचंड यशस्वी झाले आहेत. त्यांचा हा पहिलाच ग्रंथ असूनही तो अतिशय कल्पकतेने आणि प्रभावीपणे त्यांनी मराठी रसिकांच्या हातात सोपवला आहे.

माणसाच्या जगण्याचा शोध घेणारे या ग्रंथातले सगळेच लेख अतिशय वाचनीय झाले आहेत. जगण्याचा शोध म्हणजे तरी काय? इथल्या माणसांचा शोध. त्यांच्या मनाचा शोध. सत्याचा शोध. लेखक ॲड. प्रमोद आडकर यांच्या समोर एका सुंदर जीवनाचं चित्र आहे. तरुणाईच्या पंखांना नवं बळ देण्याचं सामर्थ्य या ग्रंथातल्या प्रत्येक व्यक्तिमत्त्वात आहे. भरकटत जाणाऱ्या आजच्या तरुणाईसमोर आपल्या कर्तृत्वानं मोठं बनलेल्या माणसाचं चित्र उभं करण्यात ॲड. प्रमोद आडकर यशस्वी झाले आहेत.



'देखणी ही पावलं' हा ग्रंथ फक्त ग्रंथ राहत नाही, तर तो ज्ञान, श्रम, निष्ठा आणि समाजभान यांचा नंदादीप बनून वाचकांसमोर येतो. समाजासाठी प्रचंड त्याग करणारी माणसं आणि त्यांचं कर्तृत्व ॲड. प्रमोद आडकरांनी या ग्रंथात समाजासमोर आणलं आहे. मानवी मनाला आपल्या आचरणातून कर्तृत्वाचा आदर्श देणारी ही माणसं तरुणाईच्या स्वप्नांना आणि पंखांना प्रचंड बळ देतात. माणसांना उजेडाच्या वाटा दाखवणारी आणि कठोर परिश्रमातून वेगळा आदर्श निर्माण करणारी अनेक व्यक्तिमत्त्वं या ग्रंथाचा गाभारा उजळून टाकतात.

'आधुनिक काळातील द्रष्टा तपस्वी' या लेखात डॉ. डी. वाय. पाटील विद्यापीठाचे कुलपती डॉ. पी. डी. पाटील सरांचं जीवनकार्य समर्थपणे मांडलं आहे. शिक्षण क्षेत्रात नव्या प्रकाशवाटा निर्माण करताना त्यांनी केलेला मूल्याधिष्ठित वाटेवरचा प्रवास वाचकांना थक्क करतो. नवसमाजनिर्मितीचं स्वप्न पाहणारे डॉ. पी. डी. पाटील सर भव्य हॉस्पिटलच्या माध्यमातून गोरगरिबांची सेवा करताना समाजाचा मोठा आधार बनतात. त्यांनी भरविलेल्या ८९व्या अ. भा. म.



अनुक्रमणिका

साहित्य संमेलनाने नवा इतिहास निर्माण केला. एकूणच पी. डी. सरांच्या बहुआयामी व्यक्तिमत्त्वाचा शोध लेखकाने प्रभावी शैलीतून या ग्रंथात मांडला आहे.

'एक आदर्श विचारपीठ' या अतिशय सुंदर आणि प्रभावी लेखात, भारती विद्यापीठाचे कुलपती डॉ. शिवाजीराव कदम यांच्या कर्तृत्वाचा आलेख वाचकांना नवी प्रेरणा आणि ऊर्जा देऊन जातो. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या विश्वस्त मंडळाचे अध्यक्ष म्हणून त्यांनी केलेले कार्यही मोलाचे आणि महत्त्वाचे ठरले आहे.

या ग्रंथात अनेक मान्यवर अशा कर्तृत्ववान व्यक्तींच्या जीवनकार्यावर प्रकाश टाकण्यात आला आहे. त्यात ज्येष्ठ समाजसेवक आण्णा हजारे यांचा तरुणाईला संबोधित केलेला एक लेख आहे. डॉ. गिरीश कुलकर्णी यांनी स्थापन केलेल्या अहमदनगर येथील 'स्नेहालय' या संस्थेच्या प्रचंड मोठ्या सामाजिक कार्याची ओळख या ग्रंथात आलेली आहे. स्वतःच्या घरात दोन मुलांना घेऊन अशा मुलांचे संगोपन करणारे डॉ. गिरीश कुलकर्णी आज स्नेहालयात ४०० मुलांना सांभाळतात. लालबत्ती भागातील महिलांचा विश्वास संपादन करून वेश्यांच्या मुलांच्या जीवनात ज्ञानाचा, आत्मविश्वासाचा आणि माणूसपणाचा प्रकाश पेरण्यात डॉ. गिरीश कुलकर्णी प्रचंड यशस्वी झाले आहेत.

कार्यकर्ता व्रताचा आदर्श जतन करून समाजसेवा करणारे अशोक कुरापाटी, कर्तव्यदक्ष पोलीस अधिकारी म्हणून ख्याती असलेले आणि समाजात प्रचंड माणसं जोडणारे डॉ. विठ्ठलराव जाधव, ख्यातनाम विधिज्ञ, साहित्यिक, विचारवंत ॲड. भास्करराव आव्हाड, मा. पंतप्रधान अटलविहारी वाजपेयी यांच्या गुडघ्यावर शस्त्रक्रिया करणारे आणि स्व-प्रयत्नातून यशाचं शिखर गाठणारे पद्मविभूषण डॉ. के. एच. संचेती, उद्योगातून समाजभान जागं ठेवणारे ज्येष्ठ सामाजिक कार्यकर्ते आणि उद्योजक मोहनराव गुजराथी, शिक्षणाच्या क्षेत्रात शून्यातून विश्व निर्माण करणारे द्रष्टा ज्ञानयात्री डॉ. सुधाकर जाधववर, हिंदीतल्या ज्येष्ठ कवयित्री, ज्येष्ठ ज्योतिषशास्त्रज्ञ, निःस्वार्थी आणि ऋजू व्यक्तिमत्त्वाच्या प्रतिभाताई शाहू मोडक, गोरगरिबांची आणि रुग्णांची सेवा करणारे निष्ठावंत धन्वंतरी डॉ. धनंजय केळकर, गृहप्रकल्पात ज्येष्ठांना सदनिका उपलब्ध व्हाव्यात यासाठी अथक काम करणारे 'अथश्री' योजनेचे जनक श्रीकांत परांजपे आणि शशांक परांजपे, कौशल्य विद्यापीठाचा ध्यास घेणारे श्री. विश्वेश कुलकर्णी, 'पालवी' प्रकल्पातून अनाथांची माता झालेल्या मंगलाताई शहा, महाराष्ट्राच्या साहित्य आणि सांस्कृतिक क्षेत्रात प्रचंड मोठं काम करणारे महाराष्ट्र साहित्य कला प्रसारिणी आणि जागतिक मराठी अकादमीचे सळसळत्या उत्साहाचे प्रेरणादायी नेतृत्व सचिन इटकर, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठाच्या माध्यमातून अनौपचारिक शिक्षणाला समृद्धी प्राप्त करून देणारे डॉ. नवनाथ तुपे अशा जवळपास १७ कर्तृत्ववान व्यक्तींच्या सामाजिक कार्याचा सखोल विचार ॲड. प्रमोद आडकर यांनी या ग्रंथात समर्थपणे मांडला आहे.

ॲड. प्रमोद आडकरांना सामाजिक भान आहे. त्यांना समाजाच्या सुखासाठी आणि समाजाच्या सांस्कृतिक समृद्धीसाठी खूप काही करायचं आहे. त्यांच्या सामाजिक कृतज्ञतेचा आणि सामाजिक एकरूपतेचा हा ग्रंथ एक नवा आदर्श आहे. समाजाच्या विकासासाठी झटणारी आणि समतेचा ध्यास घेतलेली या ग्रंथातली माणसं आजच्या समाजाला दीपस्तंभासारखी विचारांची दिशा देतात. समाज उद्धारासाठी झटणाऱ्या या व्यक्ती साहित्यातून समाजापुढे घेऊन येण्याचं मोलाचं काम या ग्रंथानं केलं आहे. सामाजिक, सांस्कृतिक, शैक्षणिक, साहित्य क्षेत्रांत प्रचंड काम करणारी ही माणसं आजही समाजाला दिशा देण्याचं काम करीत आहेत. ॲड. प्रमोद आडकर या लेखकानं छोटं ध्येय समोर ठेवून हा ग्रंथ लिहिलेला नाही, तर मानवी मनात माणसावद्दल प्रेमभावना निर्माण व्हावी, माणूसधर्माचं, करुणतेचं संवर्धन व्हावं या व्यापक हेतूनेच हा ग्रंथ लिहिला आहे. जीवनातली वास्तवता, विदारकता आणि विषमता समोर आल्यावर वाचक जीवनसत्यांचा अनुभव घेऊ शकतो हेच ग्रंथाने सिद्ध केले आहे.

हा ग्रंथ वाचकाला ज्ञानाचा प्रकाश देतो. हा ग्रंथ समाजाला माणुसकीचं नंदनवन देतो. हा ग्रंथ मानवतेला सुसंस्कृत बनवण्याचा मंत्र देतो. हा ग्रंथ भोवतालचा भेदाचा अंधार दूर करतो. या ग्रंथातल्या प्रत्येक लेखात माणूसपणाचं आणि विचारांचं तेज आहे. या ग्रंथात मराठी माणसाचं आणि महाराष्ट्राचं हृदय आहे. हा ग्रंथ म्हणजे समतेची, मानवतेची आणि समाजभक्तीची गुरुकिल्ली आहे. या ग्रंथातल्या करुणेनं भरलेल्या विचारांकडे दुर्लक्ष करून चालणार नाही. या ग्रंथातील सामाजिक मूल्य हाच खरं तर आपल्या राष्ट्राचा अलंकार आहे. म्हणूनच ही देखणी पावलं साधी नाहीत. हे पाय साधे नाहीत. मानवी मनाला उजेड देणारे हेच खरे मातीचे पाय आहेत.

●

**उद्धव कानडे**
कार्यवाह, मसाप, पुणे
चलभाष : ९८९०६५२७२३







कार्यवृत्त

प्रकाश पायगुडे

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे
# कार्यवृत्त नोंद
## दि. १ जानेवारी २०१९ ते ३१ मार्च २०१९

**१. दि. २१ डिसेंबर व २२ डिसेंबर २०१८ : दोन दिवसीय राम गणेश गडकरी साहित्य महोत्सव :**

लोकमंगल ग्रुप शिक्षण संस्था आणि महाराष्ट्र साहित्य परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने दोन दिवसांचा रा. ग. गडकरी साहित्य महोत्सव आयोजित करण्यात आला होता. या दोन दिवसांत गडकरींच्या साहित्यावर विनय हर्डीकर, प्रा. मिलिंद जोशी, डॉ. वर्षा तोडमल, प्रा. विश्वास वसेकर, डॉ. विनायक गंधे, डॉ. सुजाता शेणई या वक्त्यांची भाषणे झाली. या वेळी शिरीष चिटणीस, प्रकाश पायगुडे, सुनीताराजे पवार उपस्थित होते. स्वप्नील पोरे व श्रीकांत चौगुले यांनी प्रास्ताविक व सूत्रसंचालन केले. या महोत्सवाचे उद्घाटन विजय हर्डीकर यांनी केले.

**२) २४ डिसेंबर २०१८ : मसाप गप्पा :**

या उपक्रमात डॉ. प्र. चिं. शेजवलकर यांची प्रणव गोखले यांनी मुलाखत घेतली. या वेळी उषा शेजवलकर व कुटुंबीय उपस्थित होते.

**३) दि. २५ डिसेंबर २०१८ : श्री. म. माटे स्मृतिदिन :**

लोकशाहीर अण्णाभाऊ साठे अध्यासन केंद्र- सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ आणि महाराष्ट्र साहित्य परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने श्री. म. माटे यांच्या ६१व्या स्मृतिदिनाचे औचित्य साधून एक चर्चात्मक परिसंवाद आयोजित करण्यात आला होता. आचार्य रतनलाल सोनग्रा यांनी लिहिलेल्या 'विश्व साहित्यकार जनगायक आण्णाभाऊ साठे (चरित्र, प्रेरणा, चिंतन) या ग्रंथावर हा परिसंवाद आयोजित केला होता. भागलपूर (बिहार) विश्वविद्यालयाचे भाषा प्रमुख व बिहार अंगिका अकादमीचे विद्यमान अध्यक्ष हिंदी भाषिक कवी लेखक डॉ. लखनलालसिंह आरोही हे अध्यक्षस्थानी होते. या परिसंवादात प्रा. जवाहर मुथा व दीपक करंदीकर हे अन्य वक्ते होते. अध्यासन प्रमुख डॉ. सुनील भंडगे यांनी प्रास्ताविक, सूत्र संचालन व आभार प्रदर्शन केले. तसेच परिषदेचे कार्यवाह वि. दा. पिंगळे यांनी प्रास्ताविक केले.

**४) दि. २६ डिसेंबर २०१८ : मासिक मनोरंजनकार का. र. मित्र व्याख्यानमाला :**

यंदाच्या दोन दिवसीय व्याख्यानमालेतील पहिले पुष्प ९१व्या अखिल भारतीय साहित्य संमेलनाचे अध्यक्ष श्री. लक्ष्मीकांत देशमुख यांनी 'गांधीजी आणि सहिष्णुता' या विषयावर व्याख्यान देऊन गुंफले. या व्याख्यानास महात्मा गांधींच्या १५०व्या जयंतीचे औचित्य होते. या वेळी डॉ. व्ही. व्ही. घाणेकर यांनी गांधीजींवर त्यांनी लिहिलेले पुस्तक श्री. देशमुखांना भेट दिले व आपले विचार प्रकट केले.

**५) दि. २७ डिसेंबर २०१८ : मासिक मनोरंजनकार का. र. मित्र व्याख्यानमाला :**

सुधीर फडके जन्मशताब्दीनिमित्त 'बाबूजी जीवनसंगीत (श्राव्य ध्वनिफितीच्या सादरीकरणासह) या विषयावर मुलभा तेरणीकर यांनी व्याख्यान दिले. सुधीर फडके यांनी संगीतबद्ध केलेली आणि अत्यंत लोकप्रिय असलेली काही गाणी श्रोत्यांना ऐकवून त्यांची वैशिष्ट्ये उलगडून सांगितली. श्री. उस्मान शेख यांनी त्यांना तंत्रसाहाय्य केले.

**६) दि. ८ जानेवारी २०१९ :**

'लेखक तुमच्या भेटीला' या उपक्रमांतर्गत पुण्यातील सुंदराबाई राठी माध्यमिक शाळेतील विद्यार्थ्यांशी डॉ. गणेश राऊत यांनी संवाद साधला.

**७) दि. ५ जानेवारी २०१९ : पर्यावरणस्नेही साहित्य संमेलन :**

ज्येष्ठ साहित्यिक डॉ. तारा भवाळकर यांच्या अध्यक्षतेखाली दिवसभराचे साहित्य संमेलन स. प. महाविद्यालयात झाले. किर्लोस्कर वसुंधरा महोत्सव समिती, स. प. महाविद्यालय व महाराष्ट्र साहित्य परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने हे संमेलन आयोजित करण्यात आले होते. दिवसभरातील कार्यक्रमात महाविद्यालयीन विद्यार्थ्यांचा उत्स्फूर्त सहभाग होता.

पहिले सत्र : 'कैलाशपती' या वृक्षाच्या फांदीस जलपुरवठा करून संमेलनाचे उद्घाटन अध्यक्ष डॉ. तारा भवाळकर यांनी डॉ. दिलीप सेठ, प्रा. मिलिंद जोशी, विरेंद्र चित्राव, प्रकाश पायगुडे व प्रा. ठोंबरे यांच्या उपस्थितीत केले. 'वृक्षवल्ली आम्हा सोयरे वनचरे। पक्षीही सुस्वरे आळविती।।' या संत तुकाराम यांच्या अभंग गायनाने सोहळ्यास प्रारंभ झाला. अध्यक्ष डॉ. तारा भवाळकर यांनी लोकसाहित्याच्या माध्यमातून पर्यावरणाचा वेध











अनुक्रमणिका

घेणारे अध्यक्षीय व्याख्यान दिले. त्यानंतर डॉ. श्रीकांत कार्लेकर यांचे 'प्लॅस्टिकचा भस्मासूर' या विषयावर दृकश्राव्यफितीद्वारे व्याख्यान झाले. त्यानंतर 'पर्यावरण' विषयक काव्यस्पर्धेत किंवा निबंध स्पर्धेत भाग घेतलेल्यांपैकी काही विद्यार्थ्यांनी आपल्या कविता व निबंध यांचे वाचन केले. यशस्वी स्पर्धकांना पारितोषिके देण्यात आली.

दुसरे सत्र : कथाकथन : 'शिकार' व हुप्या' या कथा अनुक्रमे बाबा परीट व आप्पासाहेब खोत यांनी सांगितल्या. त्यानंतर उद्धव कानडे व कल्पना दुधाळ यांच्या कवितांचे सादरीकरण झाले.

तिसरे समारोप सत्र : ९२व्या अ. भा. म. सा. संमेलनाच्या नियोजित अध्यक्ष डॉ. अरुणा ढेरे यांच्या व्याख्यानाद्वारे संमेलनाचा समारोप झाला.

**८) दि. १८ जानेवारी २०१९ : प. पू. परमहंस स्वामी स्वरूपानंद स्मृती व्याख्यान :**

डॉ. अजित कुलकर्णी यांचे स्वामी स्वरूपानंदांचे 'अमृतधारा-एक विचारमंथन' या विषयावर व्याख्यान झाले. या वेळी वसंतराव देसाई, प्रकाश पायगुडे, सुनीताराजे पवार, दीपक करंदीकर उपस्थित होते.

**९) दि. २९ जानेवारी २०१९ : 'एक कवी, एक कवयित्री' :**

या उपक्रमांतर्गत ज्येष्ठ कवी प्रा. लक्ष्मीकांत तांबोळी आणि प्रा. डॉ. अश्विनी धोंगडे यांचे काव्यवाचन झाले. उद्धव कानडे व ॲड. प्रमोद आडकर यांनी त्या दोघांची मुलाखत घेतली.

**१०) दि. ३० जानेवारी २०१९ : राज्यस्तरीय दिवाळी अंक स्पर्धा :** स्पर्धेसाठी १५० दिवाळी अंक आले होते. त्यातील यशस्वी स्पर्धकांची यादी सोबत जोडली आहे. विनय हर्डीकर यांच्या हस्ते पारितोषिके वितरीत करण्यात आली. मान्यवरांच्या हस्ते दीप प्रज्वलीत करून समारंभास प्रारंभ झाला. या वेळी चंद्रकांत शेवाळे उपस्थित होते. महेंद्र मुंजाळ यांचा देणगीदार म्हणून सत्कार करण्यात आला. तसेच परीक्षक म्हणून काम करणाऱ्या डॉ. प्रतिमा जगताप, धनंजय तडवळकर, श्रीकांत चौगुले यांचा सत्कार करण्यात आला. पैकी डॉ. जगताप व चौगुले यांनी परीक्षकांचे मनोगत व्यक्त केले. यंदा दिवाळी अंक विक्रेते व वितरकांचा प्रथमच सत्कार करण्यात आला. पूनम एजन्सीचे श्रीकांत भुतडा, संदेश एजन्सीचे चैतन्य खरे, रोहिणी बुक डेपोच्या पुष्पलता चंद्रकांत शेवाळे, उत्कर्षचे सु. वा. जोशी, रसिक साहित्यचे भरत शेठ यांचेही सत्कार करण्यात आले. पैकी सु. वा. जोशी यांनी प्रातिनिधिक मनोगत व्यक्त केले. पारितोषिक प्राप्त अंकांच्या वतीने ग्राहकहितचे सूर्यकांत पाठक, दक्षताचे बाळासाहेब पाटील, अक्षरधाराच्या स्नेहा अवसरीकर, विद्यार्थीचे चंद्रकांत कुलकर्णी यांनी मनोगते व्यक्त केली. यानंतर चंद्रकांत शेवाळे, प्रा. मिलिंद जोशी यांनी विचार व्यक्त केले व अध्यक्ष विनय हर्डीकर यांनी समारोपाचे भाषण दिले.

**११) दि. ५ फेब्रुवारी २०१९ : कै. माधवराव मदाने स्मृति व्याख्यान :**

कॉम्रेड अजित अभ्यंकर यांचे 'भारताचे आर्थिक चित्र आणि चरित्र' या विषयावर अभ्यासपूर्ण व्याख्यान झाले. डॉ. व्ही. व्ही. घाणेकर यांनी मनोगत व्यक्त केले. व्याख्यानानंतर कॉम्रेड अभ्यंकरांनी श्रोत्यांच्या प्रश्नांना समर्पक उत्तरे देऊन संवाद साधला.

**१२) दि. ७ फेब्रुवारी २०१९ : मसाप गप्पा :**

या उपक्रमांतर्गत डॉ. रामचंद्र देखणे यांच्याशी वि. दा. पिंगळे यांनी संवाद साधला. या मुलाखतीस श्रोत्यांचा उत्स्फूर्त प्रतिसाद मिळाला.

**१३) दि. २२ फेब्रुवारी २०१९ : कमोडर (कै.) म. के. लेले स्मृतिव्याख्यान :**

कर्नल (निवृत्त) अरविंद जोगळेकर यांचे '१९४७ ते एके ४७' या विषयावर व्याख्यान झाले. या वेळी डॉ. वि. वि. घाणेकर यांनी मनोगत व्यक्त केले. प्रारंभी कार्यवाह दीपक करंदीकर यांनी 'दहशतवादी आतंक्यांविषयी' 'सामना' हे गीत सादर केले. जोगळेकर यांनी श्रोत्यांच्या प्रश्नांना उत्तरे दिली. उपस्थितांनी भारतमातेचा उत्स्फूर्तपणे जयजयकार केला.

**१४) दि. २६ फेब्रुवारी २०१९ : स्वातंत्र्यवीर वि. दा. सावरकर पुण्यतिथी :** कै. नारायणराव सावरकर यांची नात शाहीर सौ. विनता जोशी यांचा शाहिरी कार्यक्रम सादर झाला. कार्याध्यक्षांच्या हस्ते गौरवचिन्ह देऊन त्यांचा व सहकाऱ्यांचा सत्कार करण्यात आला. त्यांना शोभा ठाकूर व दीपा पुरोहित यांनी साथसंगत केली.

**१५) दि. २७ फेब्रुवारी २०१९ : राजभाषा दिन कुसुमाग्रज जयंती :**

महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे कवी कुसुमाग्रज जयंती व मराठी राजभाषा दिनानिमित्त विशेष ग्रंथ सन्मान पुरस्कार समारंभ आयोजित केला होता. काव्य विषयक कवी कुसुमाग्रज पुरस्कार, द. वा. पोतदार पुरस्कार, रा. श्री. जोग पुरस्कार, शं. ना. जोशी पुरस्कार व सुहासिनी इर्लेकर पुरस्कार या निमित्ताने एकाच वेळी देण्यात आले. प्रसिद्ध विचारवंत प्रा. हरी नरके हे अध्यक्षस्थानी होते.

मान्यवरांच्या हस्ते कुसुमाग्रजांच्या प्रतिमेला फुले वाहण्यात आली. शुभलक्ष्मी पोतदार, रूपा आडगावकर, अलका चीडगोपकर या देणगीदारांचे सत्कार करण्यात आले. आश्लेषा महाजन, जयंत भिडे, डॉ. सुहासिनी देशपांडे, कविता भालेराव, डॉ. कल्याण दिवेकर, सुनीति लिमये या परीक्षकांचा सत्कार झाला. संजीवनी तडेगावकर (संदर्भासहित-काव्य), सुनीताराजे पवार (प्रकाशक), डॉ. सचिन जोशी (इतिहास दुर्गसंवर्धन), वि. दा. वासमकर (मराठीतील कलावादी समीक्षा),वसंत खोत (प्रकाशक), मकरंद साठे (रंगभूमी आणि साहित्य), नामदेव

## महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे आयोजित दिवाळी अंक स्पर्धा २०१८चा निकाल

| पारितोषिकाचे नाव | पारितोषिक विजेते |
|---|---|
| १. अ. स. गोखले स्मृत्यर्थ 'रत्नाकर पारितोषिक' | अंक : ग्राहकहित, संपादक : सूर्यकांत पाठक |
| २. चंद्रकांत शेवाळे पुरस्कार ३ पारितोषिके : | |
| अ. विविध ज्ञानविस्तारकर्ते रावसाहेब मोरमकर पारितोषिक | अंक : वाघूर, संपादक : नामदेव कोळी |
| ब. 'मासिक मनोरंजनकार का. र. मित्र पारितोषिक | अंक : अक्षरधारा, संपादक : स्नेहा अवसरीकर |
| क. शं. वा. किर्लोस्कर पारितोषिक | अंक : दक्षता, संपादक : बाळासाहेब पाटील |
| ३. कै. जानकीबाई केळकर स्मृत्यर्थ उत्कृष्ट बालवाङ्मय | विद्यार्थी, संपादक : नितीन कुलकर्णी |
| ४. दिवाळी अंकातील उत्कृष्ट कथेसाठी दि. अ. सोनटक्के पारितोषिक | कथा 'सुमी' (लेखक : विद्या वयास ठाकूर), अंक : चपराक |
| ५. दिवाळी अंकातील उत्कृष्ट ललित लेखासाठी अनंत काणेकर पारितोषिक | लेख : 'ग्रीक सॅलेड व ग्रेसच्या कविता' लेखक : शिरीष पदकी, अंक : कलासागर |
| ६. डेलीहंट पुरस्कृत ऑनलाईन दिवाळी अंक पोरितोषिक | अंक : बिगुल, संपादक : मुकेश माचकर |

परीक्षक : डॉ. प्रतिमा जगताप, धनंजय तडवळकर, श्रीकांत चौगुले. निमंत्रक : वि. दा. पिंगळे




गवळी (भातालय) या लेखक-कवींना पुरस्कृत करण्यात आले. पैकी मकरंद साठे, डॉ. सचिन जोशी, वि. दा. वासमकर, नामदेव गवळी यांनी मनोगते व्यक्त केली. प्रा. मिलिंद जोशी व प्रा. हरी नरके यांची भाषणे झाली. प्रकाश पायगुडे यांनी आभार मानले. बंडा जोशी यांनी परीक्षकांचे निरीक्षण वाचून दाखविले व सूत्रसंचालन केले.

**१६) दि. २८ फेब्रुवारी २०१९ : राष्ट्रीय विज्ञान दिन :**

महाराष्ट्र साहित्य परिषद व मराठी विज्ञान परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने 'मराठी विज्ञान साहित्यातील संभवनीयता' या विषयावर डॉ. फुला बागूल (धुळे) यांचे व्याख्यान झाले. या वेळी विज्ञान परिषदेचे नीता शहा, शशी भाटे व डॉ. वोरकर यांना पुस्तके भेट देण्यात आली. ●

**प्रकाश पायगुडे,** प्रमुख कार्यवाह, मसाप, पुणे.
(नोंद : **दीपक करंदीकर**, कार्यवाह, मसाप पुणे)

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे
# इतर शाखा कार्यवृत्त नोंद

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा : पंढरपूर

**१. दि. २३/१२/२०१८ : पुस्तक प्रकाशन :**

मसाप शाखा पंढरपूरच्या वतीने ज्येष्ठ इतिहासकार मा. गोपाळराव देशमुख लिखीत 'सरदार मल्हारराव होळकर' या ग्रंथाचे प्रकाशन डॉ. द. ता. भोसले यांच्या हस्ते करण्यात आले. अध्यक्षस्थानी मसाप अध्यक्ष नानासाहेब रत्नपारखी होते. या वेळी डॉ. सौ. सुशीला विंजारी व डॉ. राजेंद्र मगर, कल्याणराव शिंदे, सिद्धार्थ ढवळे, डॉ. विश्वासराव मोरे, डॉ. राजेंद्र जाधव, संभाजी अडगळे, नितीन रत्नपारखी, वा. ना. उत्पात, आदी उपस्थित होते. आभार प्रा. धनाजी चव्हाण यांनी मानले.

**२. १९/९/२०१८ : म.सा.प. वर्धापनदिन :**

मसाप शाखा पंढरपूरच्या वतीने मसाप शाखा पंढरपूरचा वर्धापनदिन साजरा करण्यात आला. पंढरपूर शहर व तालुक्यातील साहित्यिकांचा सत्कार डॉ. द. ता. भोसले यांचे हस्ते करण्यात आला. मसापच्या शाखेची वाटचाल कल्याणराव शिंदे यांनी सांगितली. या वेळी शिवाजीराव बागल, राजेंद्र भोसले, अंकुश गाजरे, गणेश गायकवाड, कवी संभाजी अडगळे, निळकंठ अत्रे, द्वैपायन वरखेडकर, डॉ. सुचेता कुलकर्णी, रवि सोनार, डॉ. राजेंद्र जाधव, रमेश घळसासी, भक्ती रत्नपारखी, अशोक माळी, सुनील अडगळे, शीतल गाजरे उपस्थित होते.

**३. १३/१०/२०१८ : कादंबरीचे प्रकाशन :**

मसाप शाखा पंढरपूरच्या वतीने ज्येष्ठ साहित्यिक डॉ. द. ता. भोसले यांच्या वेगळ्या विषयावरील कादंबरीचे प्रकाशन ग्रंथाली प्रकाशनचे दिनकर गांगल यांचे हस्ते करण्यात आले. या वेळी कादंबरी विषयी डॉ. राजेंद्र दास, डॉ. महेंद्र कदम, डॉ. देवानंद सोनटक्के यांनी आपले मनोगत व्यक्त केले. या वेळी सुदेश हिंगलासपूरकर, नानासाहेब रत्नपारखी, सिद्धार्थ ढवळे, गोपाळराव देशमुख, स्वाती भोसले, जयश्री भाकरे, प्राचार्य हणमंत वाघमारे, भास्कर बंगाळे, विविध क्षेत्रांतील नागरिक मोठ्या संख्येने उपस्थित होते. या कार्यक्रमाचे प्रास्ताविक कल्याणराव शिंदे यांनी केले. आभार प्रा. धनाजी चव्हाण यांनी मानले.

**४. महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे शाखा पंढरपूर व रयत शिक्षण संस्थेचे कर्मवीर भाऊराव पाटील महाविद्यालय, पंढरपूर मराठी विभाग यांच्या सामंजस्य कराराअंतर्गत समीक्षा संमेलन व राष्ट्रीय चर्चासत्र अहवाल :**

या राष्ट्रीय चर्चासत्राचे आयोजन १ डिसेंबर २०१८ रोजी करण्यात आले. चर्चासत्राचे उद्घाटक ज्येष्ठ कवी वसंत आवाजी डहाके, तर अध्यक्ष डॉ. नागनाथ कोत्तापल्ले उपस्थित होते. ग्रामीण साहित्यिक डॉ. द. ता. भोसले, प्राचार्य डॉ. अशोक भोईटे, शिक्षक आमदार मा. दत्तात्रय सावंत, ज्येष्ठ हिंदी कवी मनोज पाठक, ज्येष्ठ मराठी कवी दिनकर दाभाडे, संपादक दा. गो. काळे, ज्येष्ठ मराठी कवी दिनकर मनवर, म.सा.प.चे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी, कार्यवाह प्रकाश पायगुडे, कोषाध्यक्ष सुनीताराजे पवार, निमंत्रक सुरेश देशपांडे, जिल्हा प्रतिनिधी पद्माकर कुलकर्णी, उद्धव कानडे, शिरीष चिटणीस, बंडा जोशी, वि. दा. पिंगळे, डॉ. शशिकला पवार, मसाप पुणे शाखा पंढरपूर अध्यक्ष नानासाहेब रत्नपारखी, कार्यवाह मा. कल्याण शिंदे, प्राचार्य वी. पी. रोंगे, नगराध्यक्ष सौ. साधनाताई भोसले, प्राचार्य दादासाहेब साळुंखे, उपनगराध्यक्ष विशाल मलपे, नगरसेवक प्रशांत शिंदे, समन्वयक डॉ. देवानंद सोनटक्के, आदी मान्यवर उपस्थित होते.

दुसऱ्या सत्रात 'आजची समीक्षा समकालीन साहित्याला न्याय देते काय?' या विषयावर प्राचार्य डॉ. महेंद्र कदम यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या परिसंवादात डॉ. सुहास पुजारी, डॉ. राजशेखर शिंदे आणि डॉ. पुरुषोत्तम काळे यांनी विचार मांडले.

दुसऱ्या सत्रात ज्येष्ठ ग्रामीण साहित्यिक डॉ. द. ता. भोसले यांची प्रकट मुलाखत डॉ. चांगदेव कांबळे व कवी सुनील जवंजाळ यांनी घेतली. तिसऱ्या सत्रात 'खुले निबंधवाचन' पार पडले. या वेळी डॉ. देवीदास गायकवाड यांच्या अध्यक्षतेखाली १६ प्राध्यापकांनी शोधनिबंध सादर केले. समारोप सत्रासाठी प्रमुख पाहुणे म्हणून मनोरमा परिवाराचे श्रीकांत मोरे, तर अध्यक्षपदी डॉ. नागनाथ कोतापल्ले होते, तर प्रमुख उपस्थिती उपप्राचार्य बी. जी. तोडकरी, एस. एस. माने, एन. एन. तंटक यांची होती. या वेळी मसाप प्रतिनिधी प्रकाश पायगुडे, शिरीष चिटणीस आणि माजी शिक्षक आमदार प्रभाकर संत यांनी मनोगते व्यक्त केली. सत्र संयोजक व सह समन्वयक म्हणून डॉ. राजाराम राठोड, प्रा. सुभाष कदम, डॉ. रमेश शिंदे आणि कु. प्रा. सारिका भांगे यांनी, तर समन्वयक म्हणून डॉ. देवानंद सोनटक्के यांनी काम पाहिले. ●

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा : उत्तर सोलापूर

**१) दि. ७ सप्टेंबर २०१८ : वक्तृत्व स्पर्धा :**

महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे शाखा उत्तर सोलापूरच्या वतीने गणेश उत्सवानिमित्त घेण्यात आलेल्या वक्तृत्व स्पर्धेचे उद्घाटन महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे शाखा उपाध्यक्षा माजी आमदार निर्मलाताई ठोकळ व महाराष्ट्र साहित्य परिषद उत्तर सोलापूरचे अध्यक्ष ह. भ. प. सुधाकर महाराज इंगळे व ज. रा. चंडक प्रशालेचे मुख्याध्यापक मोहनराव घोडके व कार्यकारिणी सदस्य, परीक्षक यांच्या उपस्थित झाला.





अनुक्रमणिका

**२. २२ सप्टेंबर २०१८ : मनोधर्माची प्रकाश किरणे व्यक्तिचित्र प्रकाशन सोहळा :**

महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे शाखा उत्तर सोलापूर व इंदिरा ज्ञानवर्धिनी यांच्या संयुक्त विद्यमाने दिनांक २२ सप्टेंबर २०१८ रोजी माजी आमदार निर्मलाताई ठोकळ यांच्या व्यक्तिचित्रणाचा प्रकाशन सोहळा डॉ. वा. का. किर्लोस्कर सभागृह सोलापूर येथे संपन्न झाला. या व्यक्तिचित्र संग्रहाचे प्रकाशन देशमुख साहेब यांच्या हस्ते झाले. या वेळी व्यासपीठावर आकाशवाणीचे संचालक सुनील शिनखेडे, डॉ. शिवाजीराव देशमुख, माजी खासदार धर्मण्णा सादूल, पद्माकर कुलकर्णी, म. सा. प. उत्तर शाखेचे अध्यक्ष सुधाकर महाराज इंगळे, शिवप्रज्ञा प्रकाशनाचे राजश्री भोसले व राजेंद्र भोसले, इंदिरा ज्ञानवर्धिनी संस्थेचे उपाध्यक्ष सचिन ठोकळ, भिकाजी गाजरे, दत्ता गाजरे, महाराष्ट्र साहित्य उत्तर शाखेचे विविध कार्यकारिणी सदस्य उपस्थित होते.

**३. दि. ९ ऑक्टोबर २०१८ : स्व. ॲड. आप्पासाहेब ठोकळ विधिज्ञ पुरस्कार :**

महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे शाखा उत्तर सोलापूर व महाराष्ट्र शिक्षण प्रसारक मंडळ, वाळे यांच्या संयुक्त विद्यमाने दि. ९ ऑक्टोबर २०१८ रोजी ॲम्फी थिएटर सोलापूर येथे आप्पासाहेब ठोकळ स्मृती विधिज्ञ पुरस्काराचे वितरण श्री. मुनगीकर यांच्या शुभहस्ते झाले. अध्यक्षस्थानी ॲड. बी. एस. पाटील उपस्थित होते. मंचावर माजी खासदार धर्माण्णा सादूल, जिल्हा सरकारी वकील प्रदीपसिंह रजपूत, बार असोसिएशनचे अध्यक्ष संतोष नायकर, ॲड. सुरेश गायकवाड, सुधीर खरटमल, माजी आमदार निर्मलाताई ठोकळ, सचिन ठोकळ यांची प्रमुख उपस्थिती होती.

**४. दि. ४ नोव्हेंबर २०१८ : मासिक महिला प्रबोधिनी दिवाळी विशेषांक उद्घाटन सोहळा :**

महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे शाखा उत्तर सोलापूर शाखेच्या वतीने दि. ४ नोव्हेंबर २०१८ रोजी इंदिरा प्रशाला, शिंदे चौक, सोलापूर येथे प्रांगणात श्री. अंकुश गाजरे (ग्रामीण कथाकार), विनोद गादेकर (ज्येष्ठ कवी), ॲड. महिंद्रकर, श्री. संतोष पवार (वृत्त निवेदक), श्री. अरविंद जोशी (वृत्त निवेदक), पद्माकर कुलकर्णी, प्राचार्या नसिमा पठाण, संपादिका माजी आमदार निर्मलाताई ठोकळ, महाराष्ट्र साहित्य परिषद उत्तर सोलापूरचे अध्यक्ष ह. भ. प. सुधाकर महाराज इंगळे, शहा मॅडम, सहसंपादक शिवाजी आतकरे व कार्यकारिणी सदस्य यांच्या उपस्थितीत महिला प्रबोधिनी दिवाळी अंकाचे प्रकाशन प्रमुख अतिथींच्या हस्ते झाले. ●

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा : चाळीसगाव

**१) दि. २ नोव्हेंबर २०१८ : दिवाळी अंक प्रकाशन :**

महाराष्ट्र साहित्य परिषद शाखा चाळीसगावने यंदाच्या वर्षी 'अत्तदीप' दिवाळी अंक प्रकाशित केला. हा प्रकाशन सोहळा दि. २ नोव्हेंबर २०१८ रोजी ९१ व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष लक्ष्मीकांत देशमुख यांच्या शुभहस्ते संपन्न झाला. या प्रसंगी मसाप, पुणेचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांचे सह नाशिक विभाग पदवीधर मतदार संघाचे आमदार डॉ. सुधीर तांबे, मसाप पुणेचे जळगाव जिल्हा प्रतिनिधी प्राचार्य तानसेन जगताप यांचेसह शाखेचे प्रमुख कार्यवाह गणेश आढाव, कार्याध्यक्ष विजय पाटील, विश्वस्त मंडळाचे अध्यक्ष डॉ. सुनिल राजपूत, संपादक प्रा. पी. एस. चव्हाण व कोषाध्यक्ष ग्रंथमित्र आण्णा धुमाळ व्यासपीठावर उपस्थित होते.

**२. दि. २५ डिसेंबर २०१८ : जिल्हास्तरीय शिवार साहित्य संमेलन :**

महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळ, मुंबई यांच्या वतीने पुरस्कृत जिल्हास्तरीय शिवार साहित्य संमेलन महाराष्ट्र साहित्य परिषद, चाळीसगाव शाखेतर्फे मेहुणबारे येथे आयोजित करण्यात आले होते. सदर संमेलन मंगळवार दि. २५ डिसेंबर २०१८ रोजी संपन्न झाले. सदर संमेलनासाठी उद्घाटक म्हणून कवी गीतकार प्रकाश होळकर यांची उपस्थिती होती. संमेलनाचे अध्यक्ष ज्येष्ठ साहित्यिक व कवी उत्तम कोळगावकर हे होते, तर स्वागताध्यक्ष श्री. राजेंद्र अमृतकर हे होते. ●

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा : पलूस

**१) २३/१/२०१९ : एक दिवशीय ग्रामीण मराठी साहित्य संमेलन :** महाराष्ट्र साहित्य परिषद शाखा पलूस व पलूस मधील स्वामी विवेकानंद ग्रामविकास मंडळ यांच्या वतीने एक दिवसीय ग्रामीण मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष म्हणून प्रा. वसंत गिरी हे होते. साहित्य संमेलनाचे उद्घाटन क्रांती समूहाचे संस्थापक अरुण अण्णा लाड यांच्या हस्ते झाले. या वेळी स्वागताध्यक्ष श्रीहरी कुलकर्णी, महाराष्ट्र साहित्य परिषदेचे अध्यक्ष प्रा. संतोष काळे, उपाध्यक्ष दत्ता मानुगडे, काकासाहेब देशमुख, सदामने सर, प्राचार्य डॉ. बी. एन. पवार, पांडुरंग पुदाले, सतीश पवार, स्वामी विवेकानंद ग्रामविकास मंडळाचे अध्यक्ष सुहास पुदाले व इतर मान्यवर उपस्थित होते.

**२. दि. २८/१/२०१९ : पु. ल. देशपांडे व ग. दि. माडगूळकर एक मुक्त चिंतन :**

महाराष्ट्र साहित्य परिषद शाखा पलूस यांच्या वतीने दि. २८/११/२०१९ रोजी पु. ल. देशपांडे व ग. दि. माडगूळकर यांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने 'पु. ल. देशपांडे व ग. दि. माडगूळकर एक मुक्त चिंतन' असा कार्यक्रम संपन्न झाला. या वेळी माजी प्राचार्य तानाजी चव्हाण उपस्थित होते. ●





अनुक्रमणिका

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा : नाशिकरोड

**१) दि.२२ जुलै२०१८ : चौथी वार्षिक सर्वसाधारण सभा :**

महाराष्ट्र साहित्य परिषद शाखा नाशिकरोडच्या चौथ्या वार्षिक सर्वसाधारण सभेच्या कार्यक्रमात व्यासपीठावर कार्याध्यक्ष श्री. उन्मेष गायधनी, श्री. दत्ता गायकवाड, प्र. कार्यवाह श्री. प्रसाद पवार, कार्यवाह श्री. रवींद्र मालुंजकर, कोषाध्यक्ष श्री. सुदाम सातभाई व जिल्हा प्रतिनिधी श्री. नितीन ठाकरे उपस्थित होते. सभेत एकूण ७ ठराव मंजूर करण्यात आले. एकूण ७४ सभासद उपस्थित होते. सभेचे आयोजन कार्यकारिणी सदस्य श्री. शिवाजी म्हस्के यांनी स्वखर्चाने केले.

**२. दि. २९ सप्टेंबर २०१८ : संवाद सृजनाशी : १४ वे पुष्प : वसंत खैरनार :**

कार्यक्रमास कार्याध्यक्ष श्री. उन्मेष गायधनी, सावानाचे प्र. कार्यवाह श्री. श्रीकांत वेणी, अनमोल पुस्तकालयाचे श्री. सोमनाथ राठी, कार्यवाह श्री. रवींद्र मालुंजकर, कोषाध्यक्ष श्री. सुदाम सातभाई, कार्यकारिणी सदस्य श्री. प्रशांत केंदळे, श्रीमती सुजाता हिंगे व श्रीमती सुरेखा गणोरे, श्री. श्रीकांत पाटील, कवी श्री. देविदास खडतले आदी उपस्थित होते.

**३. दि. २७ ऑक्टोबर २०१८ : संवाद सृजनाशी : १५ वे पुष्प : श्रीमती धारा भांड-मालुंजकर :**

कार्यक्रमास कार्याध्यक्ष श्री. उन्मेष गायधनी, कार्यवाह श्री. रवींद्र मालुंजकर, कोषाध्यक्ष श्री. सुदाम सातभाई, जिल्हा प्रतिनिधी श्री. नितीन ठाकरे, अगस्ती साखर कारखान्याचे संस्थापक व्हा. चेअरमन श्री. तुकारामबाबा मालुंजकर, साकेत प्रकाशनाच्या श्रीमती आशा भांड, सनदी लेखापाल श्री. प्रवीण मालुंजकर, नि. प्र. जि. न्या. श्री. प्रकाश कऱ्हाडकर, नि. जि. न्या. श्री. वसंत पाटील, लेखक श्री. संतोष हुदलीकर, ऋतुरंगचे सचिव श्री. प्रकाश पाटील, लेखिका श्रीमती अरुणाताई कुलकर्णी आदी उपस्थित होते.

**४. दि. २४ नोव्हेंबर २०१८ : संवाद सृजनाशी : पुष्प १६ वे : श्री. विलास पोतदार :**

कार्यक्रमास कार्याध्यक्ष श्री. उन्मेष गायधनी, नि. जि. न्या. श्री. वसंत पाटील, कार्यकारिणी सदस्य श्री. दशरथ लोखंडे, श्रीमती सुजाता हिंगे व श्री. शिवाजी म्हस्के आदी उपस्थित होते.

**५. दि. ८ डिसेंबर २०१८ : रंग अक्षरांचे : ३रे पुष्प : श्री. राजेंद्र उगले, श्री. गौरवकुमार आठवले, प्रा. राज शेळके :**

कार्यक्रमास कार्याध्यक्ष श्री. उन्मेष गायधनी, उपाध्यक्ष श्री. दत्ता गायकवाड, कार्यवाह श्री. रवींद्र मालुंजकर, कवी श्री. विजयकुमार मिठे, श्री. अरुण इंगळे, श्री. रंगराज डेंगळे, श्री. मुकुंद ताकाटे, माजी उपमहापौर श्री. रामदास सदाफुले, श्री. गणपतराव मुठाळ, सल्लागार श्रीमती अश्विनी दापोरकर आदी उपस्थित होते.

**६. दि. १० डिसेंबर २०१८ : कांदा भाव, समस्या आणि उपाय : चर्चासत्र :**

चर्चासत्रात कृषी संशोधक डॉ. सतीश श्रीवास्तव, नाफेड दिल्लीचे संचालक श्री. नानासाहेब पाटील, शेतकरी संघटनेचे कृषी विचारवंत डॉ. गिरीधर पाटील, कृषी तज्ज्ञ प्रा. अशोक सोनावणे, उपविभागीय कृषी अधिकारी श्री. दिलीप देवरे, आत्माचे अधिकारी श्री. कैलास शिरसाठ, दै. महाराष्ट्र टाइम्सचे निवासी संपादक श्री. शैलेंद्र तनपुरे, दै. सकाळचे श्री. महेंद्र महाजन, दै. लोकमतचे श्री. शेखर देसाई, अॅग्रोवनचे श्री. ज्ञानेश उगले, दै. दिव्य मराठीचे श्री. सचिन वाघ, मसाप जिल्हा प्रतिनिधी श्री. नितीन ठाकरे, कार्यकारिणी सदस्य श्री. दशरथ लोखंडे व श्री. शिवाजी म्हस्के यांनी सहभाग घेतला. कार्याध्यक्ष श्री. उन्मेष गायधनी यांनी सूत्रसंचालन केले.

**७. दि. २३ डिसेंबर २०१८ : स्मृती पुष्प पहिले : श्री. श्रीधरजी फडके :**

कार्यक्रमास कार्याध्यक्ष श्री. उन्मेष गायधनी, उपाध्यक्ष श्री. दत्ता गायकवाड, प्र. कार्यवाह श्री. प्रसाद पवार, नि. जि. न्या. श्री. वसंत पाटील, उच्च न्यायालयातील वकील श्रीमती स्मिता गायधनी, आर. जे. श्री. भूषण मठकरी, कार्यकारिणी सदस्य श्री. दशरथ लोखंडे व श्रीमती सुजाता हिंगे, आयकर अधिकारी श्री. अनिल गुरव आदी उपस्थित होते.

**८. दि. २८ डिसेंबर २०१८ : संवाद सृजनाशी : १७ वे पुष्प : श्रीमती संगीता धायगुडे :**

कार्यक्रमास कार्याध्यक्ष श्री. उन्मेष गायधनी, कोषाध्यक्ष श्री. सुदाम सातभाई, नि. आदिवासी आयुक्त श्री. रामचंद्र कुलकर्णी, नि.जि. न्या. श्री. वसंत पाटील, कार्यकारिणी सदस्य श्रीमती सुजाता हिंगे व श्री. शिवाजी म्हस्के आदी उपस्थित होते.

**९. दि. १९ जानेवारी २०१९ : यवतमाळ एक अनुभव : कवी-गीतकार मिलिंद गांधी :** कोषाध्यक्ष श्री. सुदाम सातभाई यांनी स्वागत केले. कार्यक्रमास कार्याध्यक्ष श्री. उन्मेष गायधनी, उपाध्यक्ष श्री. दत्ता गायकवाड, व्यापारी बँकेचे संचालक श्री. निवृत्त अरिंगळे, माजी नगरसेवक श्री. प्रकाश बोराडे, श्री. शामराव गायधनी, श्रीमती जोशी आदी उपस्थित होते. ●

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा : सावेडी

१) अहमदनगर शहरात वाचन संस्कृती रुजविण्यासाठी साहित्यिक व साहित्य रसिकांना प्रोत्साहन देण्याचे काम महाराष्ट्र साहित्य परिषद, सावेडी शाखा विविध उपक्रम राबवून सातत्याने करीत राहील, असे प्रतिपादन मसाप सावेडी शाखेचे अध्यक्ष नरेंद्र फिरोदिया यांनी केले. मसाप सावेडी शाखेच्या वतीने व शांतिकुमार फिरोदिया मेमोरियल फौंडेशनच्या सहकार्याने रावसाहेब पटवर्धन स्मारक सभागृहात आयोजित श्रावणी कवी संमेलन व विशेष सत्कार समारंभ आयोजित केला होता. प्रमुख कार्यवाह जयंत येलूलकर, कार्याध्यक्ष भालचंद्र बालटे, उपाध्यक्ष सदानंद भणगे, चंद्रकांत पालवे, डॉ. संदीप सांगळे उपस्थित होते. ●

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा : चोपडा (जि.जळगाव)

**१) २३ नोव्हेंबर २०१८ : काव्यात्म संगीत मैफल : अमृताहुनी गोड :**

जळगाव येथील परिवर्तन संस्था निर्मित नाट्यकर्मी श्री.हर्षल पाटील यांच्या संकल्पनेतील व दिग्दर्शित 'अमृताहुनी गोड' या काव्यात्म संगीत मैफलीने या वर्षीच्या कार्यक्रमांचा दिमाखदार शुभारंभ करण्यात आला. रंगकर्मी श्री. शंभू पाटील यांनी मराठी कवितेचा काव्य प्रवास उलगडला.

**२) २४ नोव्हेंबर २०१८ : एकपात्री प्रयोग : 'आयतं पोयतं सख्यानं' :**

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या चोपडा शाखेच्या वतीने प्रियजन स्मृती व्याख्यानमालेची सुरुवात करण्यात आली. या व्याख्यानमालेचे पहिले पुष्प उत्तर महाराष्ट्रातील शिरपूर (जि. धुळे) येथील कलावंत शिक्षक श्री. प्रवीण माळी यांच्या 'आयतं पोयतं सख्यानं' या एकपात्री प्रयोगाने गुंफण्यात आले.

**३) दि. २५ नोव्हेंबर २०१८ : अहिराणी कथाकथन : 'तोंडाय आक्का' :**

प्रा. डॉ. सौ. योगिता आशुतोष पाटील (जयहिंद महाविद्यालय, धुळे) यांनी प्रियजन स्मृती व्याख्यानमालेचे दुसरे पुष्प गुंफताना 'तोंडाय आक्का' या अहिराणी कथाकथनातून स्त्री जीवनावर भाष्य केले.

**४) दि. २६ नोव्हेंबर २०१८ : व्याख्यान : 'आयुष्याच्या कोपऱ्यावर, मागे वळून पाहताना' :**

शिरपूर (जि. धुळे) येथील आर. सी. पटेल महाविद्यालयाचे प्राचार्य डॉ. डी. आर. पाटील यांनी या व्याख्यानमालेचे तिसरे पुष्प गुंफताना 'आयुष्याच्या कोपऱ्यावर, मागे वळून पाहताना' या प्रबोधनपर विषयावर विवेचन करताना प्रभावी विचार मांडले. ●

---

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा : वारजे-कोथरूड

१) सन २०१८च्या कार्यक्रमाची सुरुवात पुस्तकाचे गाव म्हणून परिचित असलेल्या सातारा जिल्हा, पाचगणी जवळ असलेल्या भिलार येथे सभासदांच्या सहलीने झाली. एकूण चाळीस सभासद या आनंदमय सहलीत सहभागी झाले होते.

२) १८ फेब्रुवारी २०१९च्या महिन्यात सुप्रसिद्ध कवी विं.दा. करंदीकर यांच्या कविता व काव्यजीवनाची वाटचाल यावर आधारित एक दर्जेदार कार्यक्रम त्यांच्या कन्या श्रीमती जयश्री काळे यांनी सादर केला. या कार्यक्रमाला प्रमुख उपस्थिती श्री. मिलिंद जोशी यांची होती.

३) गतवर्षी वर्धापनदिनाचा कार्यक्रम १० मार्च २०१९ रोजी झाला. स्वा. सावरकर यांच्या जीवनावर आधारित 'मी विनायक दामोदर सावरकर' हा एकपात्री कार्यक्रम सुप्रसिद्ध कलाकार श्री. योगेश सोमण यांनी अत्यंत प्रभावीपणे सादर केला. याच कार्यक्रमात सभासदांनी स्वातंत्र्यवीरांची गीते सादर केली.

४) २६/४/२०१८ रोजी शाखेच्या सभासद कलाकारांनी विविध गुणदर्शनाचा कार्यक्रम सादर केला. त्यात कविता, कथाकथन इ. प्रकार होते.

५) २८ जून २०१८ रोजी सुप्रसिद्ध लेखक व सकाळ वृत्तपत्र समूहाचे संपादक श्री. मल्हार अरणकल्ले यांचे ललित लेखनामागची वाटचाल या विषयावर व्याख्यान झाले.

६) ८ ऑगस्ट २०१८ रोजी पावसाची गाणी या विषयावर आधारित पावसाच्या कविता, चित्रपटातील गाणी सभासदांनी सादर केली.

७) २६ सप्टेंबर २०१८ रोजी सुप्रसिद्ध गझल गायक श्री. रमण रणदिवे यांचा अभ्यासपूर्ण व सुरेल असा गझल गायनाचा कार्यक्रम झाला.

८) सन २०१९चा वर्धापन दिन १७/१/२०१९ रोजी साजरा झाला. ●

---

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा : ठाणे जिल्हा

**१) दि. १० जून २०१८ : व्याख्यान : कथाव्रती अरविंद गोखले :**

महाराष्ट्र साहित्य परिषद, ठाणे जिल्हा शाखेची स्थापना १० जून १९७९ रोजी झाली होती. त्यानुसार ३९ वा वर्धापन दिन १० जून २०१८ रोजी साजरा करण्यात आला. सुप्रसिद्ध कथाकार अरविंद गोखले यांचे हे जन्मशताब्दी वर्ष असल्याने 'कथाव्रती अरविंद गोखले' या विषयावर डॉ. विद्या नानल यांचे व्याख्यान आयोजित करण्यात आले होते. अरविंद गोखले यांचे कथात्म साहित्य आणि त्यांचे समकालीन लेखक यांनी नवकथेच्या वाटा कशा निर्माण केल्या, त्यात अरविंद गोखले यांचा वाटा किती मोलाचा होता, तो संपूर्ण नवकथेचा कालखंड डॉ. नानल यांनी कथन केला.

कथाव्रती अरविंद गोखले या ग्रंथाच्या संपादिका आणि मराठीतील पहिल्या धाडसी महिला पत्रकार म्हणून ज्यांना ओळखले जाते त्या नीला उपाध्ये यांनी अरविंद गोखले यांची 'मंजुळा' ही कथा वाचून सादर केली. आपण पत्रकार व्हावे हा आग्रह गोखले काकांचा होता. त्यांच्यामुळे मी पत्रकार झाले असेही त्यांनी मनोगतात सांगितले.

पद्माकर शिरवाडकर, कार्याध्यक्ष यांनी कार्यक्रमाचे सूत्रसंचालन केले. चांगदेव काळे, कार्यवाह यांनी आभार मानले.










अनुक्रमणिका

**दि. २९ सप्टेंबर २०१८ : म. वि. फाटक स्मृतिपुष्प :**

महाराष्ट्र साहित्य परिषद, ठाणे जिल्हा शाखेच्या स्थापनेत मोठा वाटा असलेले प्राचार्य म. वि. फाटक यांच्या ३१व्या स्मृतिव्याख्यान दिनानिमित्ताने सौ. मेधा सोमण यांचे 'याज्ञवल्क्य आणि समर्थ रामदास' या विषयावर व्याख्यान आयोजित करण्यात आले होते. याज्ञवल्क्य राजाने केलेले कार्य आणि रामदास स्वामी यांनी केलेले कार्य यांच्याविषयींची माहिती त्यांनी व्याख्यानातून विषद केली.

हा कार्यक्रम ठाणे नगर वाचन मंदिर यांच्या संयुक्त विद्यमाने आयोजित करण्यात आला होता. त्या संस्थेचे केदार जोशी, उपाध्यक्ष, हे या कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी होते. सोमण मॅडम यांच्यामुळे एक वेगळा विषय समजला याचा आनंद झाला, असे ते अध्यक्षीय भाषणात म्हणाले. या कार्यक्रमांचे प्रास्ताविक चांगदेव काळे, कार्यवाह यांनी केले. स्वाती कुलकर्णी, कार्यवाह यांनी आभार मानले.

**३. दि. २८ ऑक्टोबर २०१८ : शब्दव्रती आनंदयात्री :**

सुप्रसिद्ध कवयित्री, गीतकार शांता शेळके यांच्या कविता, गाणी आणि आठवणींच्या आधारे त्यांचा साहित्य प्रवास उलगडणारा सुश्राव्य कार्यक्रम 'शब्दव्रती आनंदयात्री' आयोजित करण्यात आला होता. या कार्यक्रमांची संकल्पना व संहिता लेखन माधवी जोग यांचे होते. निवेदन माधवी जोग आणि अर्चना पंडित यांनी केले. सुचेता गोखले आणि स्वप्ना रानडे या गायिका होत्या. त्यांनी भावगीते, चित्रपट गीते, लावण्या आणि कविता सादर केल्या. डॉ. वसुधा सहस्रबुद्धे या कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी होत्या. त्यांनी शांता शेळके यांच्या साहित्यावर मनोगत व्यक्त करून सादरीकरण सुंदर केले यासाठी सर्वांचे कौतुक केले. प्रास्ताविक पद्माकर शिरवाडकर यांनी केले.

**४. दि. १८ नोव्हेंबर २०१८ : सत्कार समारंभ :** ९२व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी निवड झाली, त्यानिमित्ताने अध्यक्षा डॉ. अरुणा ढेरे यांचा जाहीर सत्कार मराठी ग्रंथ संग्रहालय, ठाणे या संस्थेच्या वतीने आयोजित करण्यात आला होता. त्या सत्कार सोहळ्यात महाराष्ट्र साहित्य परिषद, ठाणे जिल्हा शाखा सहभागी झाली होती. शाखेच्या वतीने डॉ. अरुणा ढेरे यांचा सत्कार पद्माकर शिरवाडकर, कार्याध्यक्ष यांच्या हस्ते करण्यात आला.

**५. दि. २२ डिसेंबर २०१८ : असा जोगिया रंगे :**

सुप्रसिद्ध कवी, गीतकार व वाल्मिकी ग. दि. माडगूळकर यांच्या जन्मशताब्दी निमित्ताने 'असा जोगिया रंगे' या कार्यक्रमाचे आयोजन करण्यात आले होते. कविता व गीतांची निवड आणि रसास्वाद सुप्रसिद्ध कवयित्री मधुवंती सप्रे यांची होती. नंदिनी बोरगावकर, अनुपमा सिंहासन आणि राधिका यांनी गदिमांच्या कविता व गीते गाऊन सादर केली. प्रास्ताविक पद्माकर शिरवाडकर, कार्याध्यक्ष यांनी केले. डॉ. अनंत देशमुख यांनी मधुवंती सप्रे यांच्या साहित्य गुणांचे त्यांच्या पीएच. डी.च्या यशाचे मनापासून अभिनंदन केले. गदिमांची प्रतिभा, त्यांच्या जीवनात आलेले नानाविध प्रसंग यांचे संदर्भ त्यांनी श्रोत्यांसमोर उलगडून दाखविले.

**६. दि. २० जानेवारी २०१९ : सत्कार आणि मुलाखत :**

नागपूर येथे होणाऱ्या ९९व्या अखिल भारतीय मराठी नाट्यसंमेलनाच्या अध्यक्षपदी निवड झाल्याबद्दल सुप्रसिद्ध नाटककार श्री. प्रेमानंद गज्वी यांचा सत्कार व मुलाखत आयोजित करण्यात आली होती. डॉ. वसुधा सहस्रबुद्धे या कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी होत्या. डॉ. अनंत देशमुख यांच्या हस्ते प्रेमानंद गज्वी यांचा सत्कार करण्यात आला. मकरंद जोशी यांनी त्यांच्याशी मुलाखत स्वरूपात संवाद साधला. नाटक हा साहित्याचाच अविभाज्य घटक आहे. त्याला वेगळे करता येणार नाही. मी कुठली ही पगडी सूत्र स्वीकारताना घालणार नाही. मी विवेकाची पगडी घालणारा नाटककार आहे, असे त्यांनी मनोगतात सांगितले. ●

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा : सोपाननगर-सासवड

१) पुणे जिल्हा शिक्षण मंडळाचे वाघीरे महाविद्यालय बहिःशाल शिक्षण मंडळ, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ आणि महाराष्ट्र साहित्य परिषद शाखा सोपाननगर-सासवड यांच्या संयुक्त विद्यमाने महात्मा गांधी यांच्या स्मृति दिनानिमित्त 'संत गाडगेमहाराज ज्येष्ठ नागरिक व्याख्यानमाला' आयोजित केली होती. या व्याख्यानमालेचे उद्घाटक रावसाहेब पवार, कार्यक्रमाचे अध्यक्ष वाघीरे महाविद्यालयाचे प्राचार्य डॉ. नितीन घोरपडे, प्रमुख पाहुणे म्हणून पुणे जिल्हा सहकारी बँकेचे संचालक संजय जगताप होते. सुरेश कोडीतकर, पांडुरंग शिरवळकर, मोहन साळवी, सिद्धराम भुजबळ, के. टी. बेल्हेकर, सिद्धीविनायक अत्रे, लक्ष्मण कुलकर्णी, युसुफ रहिमान सय्यद, डॉ. नाना झगडे, प्रा. व्यास व्ही. वाय. पाटील, व्ही. व्ही. इ. मान्यवर आणि ज्येष्ठ नागरिक मोठ्या संख्येने उपस्थित होते. कार्यक्रमाचे प्रास्ताविक व पाहुण्यांचा परिचय बहिःशाल शिक्षण मंडळ केंद्र कार्यवाह डॉ. नानासाहेब पवार यांनी करून दिला.

●

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा : जुळे सोलापूर

१) ७/१/२०१९ : सोलापूर येथे ३,४,५ आणि ६ जानेवारी २०१९ रोजी हुतात्मा मंदिर, हिराचंद नेमचंद वाचनालय, ॲम्फी थिएटर, प्रभात टॉकीज या सर्व ठिकाणी ज्येष्ठ दिवंगत साहित्यिक कै. पु. ल. देशपांडे यांच्या जन्मशताब्दीनिमित्त 'पुलोत्सव सोलापूर'चे आयोजन करण्यात आले होते. त्यामध्ये रविवार दि. ६ जानेवारी २०१९ रोजी हुतात्मा स्मृतिमंदिरामध्ये मसाप सोलापूर,

मसाप जुळे सोलापूर, मसाप दक्षिण आणि मसाप उत्तर सोलापूर यांच्या संयुक्त विद्यमाने 'पु. लं. नी महाराष्ट्राला काय दिले?' या परिसंवादाचे आयोजन करण्यात आले होते. त्यात आकाशवाणी सोलापूरचे साहाय्यक संचालक मा. सुनिल शिनखेडे, ज्येष्ठ साहित्यिका सौ. मंगला गोडबोले आणि मसाप सोलापूर, अध्यक्ष व ज्येष्ठ साहित्यिक डॉ. सुहास पुजारी यांनी सहभाग घेऊन या चर्चेद्वारे पु. लं.विषयी खूपच छान, रंजक अशी माहिती दिली. या कार्यक्रमाला साहित्य रसिक, मसाप सर्व शाखा कार्यकारिणी सदस्य मोठ्या संख्येने हजर होते.

२) १९/१/२०१९ : महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा जुळे सोलापूर आणि वसुंधरा कला महाविद्यालय जुळे सोलापूर संयुक्त विद्यमाने 'मराठी भाषा संवर्धन पंधरवडा' निमित्ताने 'प्रा. त्रं. वि. सरदेशमुख यांच्या कादंबऱ्या एक अभ्यास' या विषयावर एक परिसंवाद वसुंधरा कला महाविद्यालयाच्या हॉलमध्ये शुक्रवार दि. १८ जानेवारी २०१९ रोजी सकाळी १० ते १२.३० वाजेपर्यंत आयोजित केलेला होता. या परिसंवादाचे प्रास्ताविक प्राचार्य तानाजी देशमुख यांनी, तर प्रमुख पाहुणे वक्त्यांचे स्वागत मसाप जुळे सोलापूर अध्यक्ष पद्माकर कुलकर्णी यांनी केले. या परिसंवादाचे उद्घाटन अन् बीजभाषण ज्येष्ठ पत्रकार रजनीश जोशी यांनी केले, तर ज्येष्ठ कवी हेमकिरण पतकी आणि डॉ. प्रिया निघोजकर यांनीही आपले विचार उत्तमरीत्या व्यक्त केले. या वेळी सोलापूर विद्यापीठाचे माजी कुलगुरू डॉ. इरेश स्वामी, कार्याध्यक्ष सौ. सायली जोशी, उपाध्यक्ष प्रशांत जोशी, प्रमुख कार्यवाह गिरीश दुनाखे, संदीप कुलकर्णी, श्रीकांत कुलकर्णी, जयंत रायते, हर्षा पटवारी व इतर कार्यकारिणी सदस्य तसेच कवी पुरुषोत्तम नगरकर, साहित्यिक नितीन वैद्य, डॉ. राजशेखर शिंदे, दत्ता घोलप आणि विद्यार्थी-विद्यार्थिनी तसेच परिसरातील साहित्यप्रेमी रसिक उपस्थित होते. या कार्यक्रमाचे सूत्रसंचालन प्रा. डॉ. किशोर जोगदंड यांनी, तर आभारप्रदर्शन प्रा. सौ. संगीता भोसले यांनी केले.

३) दि. २३/२/२०१९ : मसाप जुळे सोलापूर शाखा कार्यकारिणीतर्फे ज्येष्ठ साहित्यिक श्रीधर माडगूळकर यांना भावपूर्ण श्रद्धांजली वाहण्यात आली. ●

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा : धुळे जिल्हा

**१) दि. १४ जानेवारी २०१९ :** पु. ल. देशपांडे जन्मशताब्दी निमित्ताने दि. १४ जानेवारी २०१९ रोजी आयोजित कार्यक्रमात प्रमुख वक्ते प्रा. डॉ. संजीव गिरासे यांनी पु. ल. देशपांडे यांच्या बहुआयामी व्यक्तिमत्त्वावर प्रकाश टाकला. अध्यक्षीय समारोपात धुळे जि. मसाप शाखेच्या अध्यक्षा प्रा. उषा पाटील यांनी पु.ल. देशपांडे यांच्या व्यक्तिमत्त्वाचे विविध पैलू उलगडून दाखविले. कार्यक्रमाचे आयोजन, प्रास्ताविक, आभार, सूत्रसंचालन इत्यादीस धुळे जि. प्रतिनिधी प्रा. डॉ. शशिकला पवार, मसापचे (धुळे शाखा) कार्याध्यक्ष प्रा. डॉ. सी. एन. पगारे, कार्यवाह प्रा. डॉ. सुरेंद्र मोरे, कार्यवाह प्रा. डॉ. वाल्मीक आढावे, कोषाध्यक्ष प्रा. डॉ. सुनील पवार, प्रा. डॉ. विद्या पाटील, प्रा. डॉ. योगिता पाटील, प्रा. वर्षा पाटील या सर्वांचे सहकार्य लाभले.

**२) दि. ९ फेब्रुवारी २०१९ :** रोजी प्रा. एल. जी. सोनवणे यांचे 'मीच माझ्या जीवनाचा रखवालदार' या विषयावर व्याख्यान आयोजित करण्यात आले. अध्यक्षीय समारोप मीराताई धाराशिवकर यांनी केला. कार्यक्रमाचे आयोजन, प्रास्ताविक, आभार, सूत्रसंचालन इत्यादीस धुळे जि. प्रतिनिधी प्रा. डॉ. शशिकला पवार, मसापचे (धुळे शाखा) कार्याध्यक्ष प्रा. डॉ. सी. एन. पगारे, कार्यवाह प्रा. डॉ. सुरेंद्र मोरे, कार्यवाह प्रा. डॉ. वाल्मीक आढावे, कोषाध्यक्ष प्रा. डॉ. सुनील पवार, प्रा. डॉ. विद्या पाटील, प्रा. डॉ. योगिता पाटील, प्रा. वर्षा पाटील या सर्वांचे सहकार्य लाभले.

**३) दि. २७ फेब्रुवारी २०१९ :** रोजी कवी कुसुमाग्रजांची जयंती 'मराठी राजभाषा दिन' म्हणून साजरी करण्यात आली. या प्रसंगी धुळे जि. प्रतिनिधी प्रा. डॉ. शशिकला पवार यांनी मराठी भाषेचा वैभव संपन्न आलेख काळानुसार अधोरेखित केला.

कवी कुसुमाग्रजांच्या निवडक कवितांचे रसपूर्ण विवेचन मसाप अध्यक्षा प्रा. उषा पाटील यांनी केले. प्रा. डॉ. संजीव गिरासे, श्री. महेश धुगरी, प्रा. डॉ. योगिता पाटील, श्री. धनंजय दीक्षित यांनीही कविता सादर केल्या. कार्यक्रमाचे आयोजन, प्रास्ताविक, आभार, सूत्रसंचालन इत्यादीस धुळे जि. प्रतिनिधी प्रा. डॉ. शशिकला पवार, मसापचे (धुळे शाखा) कार्याध्यक्ष प्रा. डॉ. सी. एन. पगारे, कार्यवाह प्रा. डॉ. सुरेंद्र मोरे, कार्यवाह प्रा. डॉ. वाल्मीक आढावे, कोषाध्यक्ष प्रा. डॉ. सुनील पवार, प्रा. डॉ. विद्या पाटील, प्रा. डॉ. योगिता पाटील, प्रा. वर्षा पाटील या सर्वांचे सहकार्य लाभले. ●

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा : दामाजीनगर

**साहित्य चळवळीला बळ आणि दिशा देणारा दामाजीनगर शाखा मेळावा :**

दामाजीनगर (मंगळवेढा) या संत नगरीतल्या या शाखा मेळाव्याची सुरुवात स्वाभाविकपणे संत दामाजीपंताच्या मंदिरातून ग्रंथदिंडीने झाली. या ग्रंथ दिंडींचा प्रारंभ रतनचंद शहा अर्बन बँकेचे चेअरमन राहुल शहा यांचे हस्ते झाला. प्रा.मिलिंद जोशी, प्रकाश पायगुडे, पद्माकर कुलकर्णी, कल्याण शिंदे, मेळाव्याचे स्वागताध्यक्ष नंदकुमार पवार, नगराध्यक्षा अरुणा माळी, दामाजीनगर शाखा अध्यक्ष प्रकाश जडे यांचे हस्ते दीपप्रज्वलन व सरस्वती पूजनाने मेळाव्याचा प्रारंभ झाला. उद्घाटन समारंभाच्या अध्यक्षा अरुणा माळी यांनी स्वतः म.सा.प. दामाजीनगर शाखेचो सभासद असल्याचा अभिमान व्यक्त करून साहित्य चळवळीस









अनुक्रमणिका

सर्वतोपरी सहकार्य करणार असल्याचे सांगितले. पुण्याच्या गझलकार सुप्रिया जाधव यांचे अध्यक्षतेखाली कविसंमेलन झाले. त्यात वंदना कुलकर्णी, संभाजी अडगळे, संगीता मासाळ, योजना मोहिते, विद्या माने, सुरेखा गावंडे, धनंजय पाटील, गोरक्ष जाधव, गणेश गायकवाड, सुरेशकुमार लोंढे, सुनिल बिराजदार यांनी आपल्या कविता सादर केल्या. प्रा. दत्ता सरगर यांनी खुमासदार सूत्रसंचालन केले.

महाकवी ग. दि. माडगूळकर, महाराष्ट्राचे लाडके व्यक्तिमत्त्व पु. ल. देशपांडे, संगीतकार गायक सुधीर फडके व सोलापूरचे कवी–कादंबरीकार प्रा. त्र्यं. वि. सरदेशमुख यांच्या जन्मशताब्दी निमित्त त्यांच्या भव्य डिजिटल छायाचित्रांचे प्रकाशन जयदीप रत्नपारखी यांचे हस्ते करण्यात आले. या वेळी दत्ता तोडकरी यांची विशेष उपस्थिती होती. महाराष्ट्र साहित्य परिषद शाखा दामाजीनगरच्या वतीने देण्यात येणारे विविध साहित्य पुरस्कार पुढीलप्रमाणे देण्यात आले. स्व.मासाजी शिवशरण स्मृती पुरस्कार – सुप्रिया जाधव कोषांतर (कवितासंग्रह), स्व. कलावती वाकळे स्मृती पुरस्कार – योजना मोहिते – होरपळ व हिरवळ (कथासंग्रह), स्व. सिद्धमाला ढगे स्मृती पुरस्कार सुनिल जवंजाळ – काळीजकाटा (कादंबरी), स्व. इंदुमती शिर्के स्मृती पुरस्कार – प्रा. डॉ. श्रुतीश्री वडगबाळकर – बहेणाबाई (चरित्रात्मक कादंबरी), काशी जनाई सरगर स्मृती पुरस्कार – प्रा. डॉ. देवानंद सोनटक्के – समिक्षेची अपरूपे (समिक्षा), शहिद स्व. राजकुमार ठोंबरे स्मृती साहित्य पुरस्कार – सौ. वंदना कुलकर्णी – सोलापूरी काव्य सरिता (रसग्रहणात्मक).

दुपारच्या सत्रात प्रा.मिलिंद जोशी यांचे अध्यक्षतेखाली शाखा मेळावा झाला. त्यात प्रकाश पायगुडे, पद्माकर कुलकर्णी, कल्याण शिंदे, सुरेश देशपांडे, भिकू बारस्कर, सौ.आशा जोशी, सौ. सुरेखा गावंडे, रावसाहेब पवार, प्राचार्य तानसेन जगताप, राजेंद्र मुठाणे, सौ. लीलावती जगताप, डॉ. शशिकला पवार, आशा पाटील, माजी आमदार प्रभाकर संत, रविंद्र बेंडकीहाळ, ताराचंद्र आवडे, सौ. अलका बेंडकीहाळ, रविंद्र येवले, प्रकाश पाटील, वनमाला मस्के, डॉ. श्रीकांत पाटील या डोंबिवली, कल्याण, पुणे, सासवड, पंढरपूर, चाळीसगाव, इचलकरंजी, धुळे, सोलापूर, फलटण, वारणानगरचे प्रतिनिधींनी आपले विचार मांडले. या वेळी मंगळवेढा नगरीचा सर्वांगीण वेध घेणाऱ्या स्मरणिकेचे प्रकाशन करण्यात आले.

या मेळाव्याचे सूत्रसंचालन प्रा. राजेंद्र जाधव, सौ. स्मिता जडे, व बालाजी शिंदे यांनी केले. ईशस्तवन सौ. शुभदा जोशी यांनी, तर शेवटी पसायदान सौ. स्मिता जडे यांनी गायले. प्रा. विश्वनाथ ढेपे यांच्या आभार प्रदर्शनाने मेळाव्याची सांगता झाली. हा मेळावा यशस्वी करण्यासाठी यतिराज वाकळे (कार्याध्यक्ष), बालाजी शिंदे, संभाजी सरगर (कार्यवाह), अशपाक काझी (कोषाध्यक्ष), दिगंबर भगरे, प्रा.विश्वनाथ ढेपे, प्रा.पठाण शिवशरण, लहु ढगे, संगीता मासाळ, सुषमा सुतार, प्रफुल्लता स्वामी, रेखा जडे, सौ. तेजस्विनी कदम, सुधा मांडवे, धनंजय पाटील, दया वाकडे, गोरक्ष जाधव, रेश्मा गुंगे, मयुर हजारे यांनी विशेष परिश्रम घेतले.

●





अनुक्रमणिका



महाराष्ट्र साहित्य परिषद पुणेचा कै. विलास शंकर रानडे स्मृती साहित्य पुरस्कार मनीषा बाठे यांच्या 'गाथा क्रीडातपस्वींची' या पुस्तकासाठी प्रदान करताना सदानंद मोहोळ



किर्लोस्कर वसुंधरा आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवात महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे आणि स.प.महाविद्यालय यांच्या संयुक्त विद्यमाने आयोजित पर्यावरणस्नेही साहित्य संमेलनाचे उद्घाटन करताना प्राचार्य दिलीप शेठ. समवेत संमेलनाच्या अध्यक्ष डॉ. तारा भवाळकर व मान्यवर.



महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे आयोजित कविश्रेष्ठ कुसुमाग्रज यांच्या जयंतीनिमित्त साहित्यिक हरी नरके यांच्या हस्ते विविध पुरस्कारांचे वितरण
पुरस्काराचे मानकरी :
१) कुसुमाग्रज स्मृती पुरस्कार : डॉ. संजीवनी तडेगावकर (जालना),
२) द. वा. पोतदार स्मृती पुरस्कार : डॉ. सचिन जोशी (पुणे)
३) रा. श्री. जोग स्मृती पुरस्कार : डॉ. वि. दा. वासमकर (सांगली)
४) शं. ना. जोशी स्मृती पुरस्कार : मकरंद साठे (पुणे)
५) सुहासिनी इर्लेकर स्मृती पुरस्कार : नामदेव गवळी (सिंधुदुर्ग)

Maharashtra Sahitya Patrika. Quarterly : March 2019
Registered with the Register of Newspaper for India under No. 6398/57
Book Pkt. Periodical Category. Publishing Date : 31 March 2019

# महाराष्ट्र साहित्य परिषद पुस्तक सूची

२५टक्के सवलतीत!




## सूची

| | |
|---|---|
| मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड १ : | रु. ५००/- |
| मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड २ (भाग१) : | रु. ७००/- |
| मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड २ (भाग२) : | रु. ७००/- |
| मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ३ : | रु. ३५०/- |
| मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ४ : | रु. ४००/- |
| मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ५ (भाग १) : | रु. ३५०/- |
| मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ५ (भाग २) : | रु. ३५०/- |
| मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ६ (भाग १) : | रु. ३५०/- |
| मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ६ (भाग २) : | रु. ३००/- |
| मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ७ (भाग १) : | रु. ७००/- |
| मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ७ (भाग २) : | रु. ८००/- |
| मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ७ (भाग ३) : | रु. ७००/- |
| मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ७ (भाग ४) : | रु. ७००/- |
| भारतीय भाषांतील स्त्रीवादी साहित्य : | रु. ८००/- |
| भाषा व साहित्य संशोधन खंड १ : | रु. ५००/- |
| भाषा व साहित्य संशोधन खंड २ : | रु. ३००/- |
| भाषा व साहित्य संशोधन खंड ३ : | रु. २००/- |
| म.सा.पत्रिका लेख-सूची : | रु. ४००/- |

डिमांड ड्राफ्टने आगाऊ पाठविल्यास संपूर्ण संच आमच्या खर्चाने रेल्वे अगर एस. टी. पार्सलने पाठवू. (वरील संचातील सुटे भाग हवे असल्यास ग्रंथविक्रेत्यांना २५ टक्के सूट. व्यक्तिगत ग्राहकांना व संस्थांना १५ टक्के सूट. टपालखर्च वेगळा.)

मागणीसाठी संपर्क : **महाराष्ट्र साहित्य परिषद**, टिळक रस्ता, पुणे - ४११ ०३०. दूरभाष : ०२०- २४४७५९६३/६

बुक-पोस्ट

प्रेषक
प्रमुख कार्यवाह,
**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे - ४११ ०३०.
दूरभाष : ०२०-२४४७५९६३